


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








म.सा.प.

संपादक – वि. स. वाळिंबे

अंक २६६ जुलै–सप्टें. १९९३

अंक २६७ ऑक्टो. – डिसें. १९९३ (डि.९३)

अंक २६८ जाने. – मार्च १९९४

अंक २६९ एप्रिल–जून १९९४

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २६६, जुलै-सप्टेंबर १९९३



**संपादक : वि. स. वाळिंबे**

संपादन समिती : प्रा. म. द. हातकणंगलेकर, डॉ. वि. भा. देशपांडे,
प्रा. विजय कसबेकर, हरी नरके, संतोष शेणई



**विज्ञापन समन्वयक : ह. ल. निपुणगे**



**मुखपृष्ठ : रविमुकुल**



**या अंकाची किंमत : २५ रुपये**

वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ७५ रुपये)

आजीव सदस्य शुल्क ५०० रु. वार्षिक सदस्य शुल्क ५० रु.



मुद्रक - प्रकाशक : डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्यवाह,
महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता,
पुणे ४११ ०३०. (दूरभाष : ४४२९६३)

मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

अनुक्रमणिका

# अंतरंग



---

लेखांतील मतांशी महाराष्ट्र साहित्य परिषद असेलच असे नव्हे.

# संपादकीय

कोणत्याही कलाप्रकारामध्ये कालांतराने साचेबंदता येते. एका ठराविक परिघातच तो कलाप्रकार रेंगाळू लागतो. साहजिकच मूळचा मंत्र बाजूला पडून तंत्राला मातब्बरी प्राप्त होते. ही संकुचितता अभिजात सर्जनशीलतेचे देणे लाभलेल्या कलावंताला जाचक वाटते, असह्य होते. त्यातूनच त्याची बंडखोरी प्रवर्तित होते; तो आपली नवी वाट रेखाटू लागतो.

मराठी कवितेच्या संदर्भात हे लक्षणीय कार्य कविवर्य बा. सी. मर्ढेकर यांनी पार पाडले. त्यामुळेच त्यांना नवकवितेचे प्रवर्तक म्हणून ओळखले जाऊ लागले. मर्ढेकरांची 'प्रेमाचे लव्हाळे' ही मराठीमधील पहिली नवकविता. त्यांनी ती १९४३ मध्ये लिहिली. या अनन्यसाधारण वाङ्मयीन कर्तृत्वाला यंदा पन्नास वर्षे पूर्ण झाली; म्हणून या पहिल्या नवकवितेचा सुवर्णमहोत्सव ऑगस्टमध्ये साजरा करण्यात आला. त्यानिमित्ताने मुंबई येथे 'मला उमगलेले मर्ढेकर' या विषयावर चर्चासत्र घेण्यात आले. तसेच मर्ढेकरांच्या आणि मर्ढेकरोत्तर कालखंडातील अन्य काही कवींच्या कवितांचे वाचन करण्यात आले. एखाद्या कवितेचे अशा रीतीने स्मरण केले जाणे, हे तिच्या ऐतिहासिकतेचे निदर्शक ठरते.

नवकवितेचा विषय निघाला की, आठवण होते ती विंदा करंदीकर यांची. मर्ढेकरांचा वसा ज्यांनी समर्थपणे पेलला आणि पुढे चालविला अशा कवींमध्ये विंदा करंदीकर यांचे स्थान बरेच वरचे आहे. योगायोग असा की, मर्ढेकरांच्या पहिल्या नवकवितेचा सुवर्ण-महोत्सव साजरा होत असतानाच कविवर्य विंदा करंदीकर यांनी आपल्या वयाची ७५ वर्षे पूर्ण केली. त्यामुळे एका कवितेचा सुवर्णमहोत्सव आणि एका कवीचा अमृतमहोत्सव, असा योग जुळून आला.

विंदा करंदीकर गेली ४०-४५ वर्षे कविता लिहीत आलेले आहेत. त्यांची कविता एकसाची नाही. तिने अनेक रूपे आत्मसात केलेली आहेत. शब्दांसंबंधी अमर्याद आस्था असल्याशिवाय असा प्रतिभाविष्कार संभवत नाही.

शब्दांसंबंधीचे हे अगत्य त्यांच्या एका कवितेमध्ये नेमकेपणाने व्यक्त झाले आहे :

*'पाहिजेत शब्द, बकुळीच्या कुशीतले, दर्याच्या मिशीतले*
*पाहिजेत शब्द पहाटेच्या ओटीतले, थडग्याच्या मिठीतले.'*

मर्ढेकरांशी नाते जुळणारे आणखी एक साहित्यिक म्हणजे गंगाधर गाडगीळ. मर्ढेकर-करंदीकरांनी कवितेच्या क्षेत्रामध्ये जशी नवता आणली त्याच तोलामोलाचे कार्य

गंगाधर गाडगीळांनी लघुकथेच्या आणि समीक्षेच्या क्षेत्रांत केले. गंगाधर गाडगीळांच्या आधीची मराठी कथा आणि गाडगीळांची कथा ह्यांचा आशय आणि अभिव्यक्ती ह्यांच्या संदर्भात विचार केला की, मराठी कथेला नवे वळण देण्यात गाडगीळांचा सहभाग केवढा महत्त्वपूर्ण आहे ह्याची कल्पना येते. गाडगीळांनी कादंबरी, नाटक, विनोदी लेखन हे साहित्यप्रकारही हाताळले. त्यांची प्रवासवर्णनेही गाजली. परंतु गाडगीळ मुख्यतः ओळखले जातात ते कथाकार आणि समीक्षक म्हणून. गाडगीळ ह्यांच्या लेखनाचा विशेष असा की, त्यांनी मराठी साहित्याला एक नवी संवेदनशीलता दिली. माणसाकडे केवळ माणूस म्हणून पाहायला मराठी कथाकारांमध्ये प्रथम गंगाधर गाडगीळ यांनीच सुरुवात केली.

अशा ह्या मराठी साहित्यातील एका मानदंडाने २५ ऑगस्टला एकाहत्तराव्या वर्षात पदार्पण केले. ह्या निमित्ताने गाडगीळांचे मुंबई, पुणे आदी ठिकाणी रसिकांच्या वतीने सत्कार करण्यात आले.

कविवर्य विंदा करंदीकर आणि कथाकार गंगाधर गाडगीळ ह्या उभयतांचे ह्या निमित्ताने हार्दिक अभिनंदन.

**शोकसमाचार**

गेली अनेक वर्षे मराठी साहित्यकृतींची आपल्या वेगळ्या पद्धतीने समीक्षा करीत आलेले धोंडो विठ्ठल देशपांडे ह्यांचे १९ जुलै रोजी निधन झाले. ते ७६ वर्षांचे होते.

धों. वि. देशपांडे वाचकांना परिचित होते ते 'अश्मसार' या टोपण नावाने. कारण त्यांचे राजकीय टीकालेख या नावानेच प्रसिद्ध होत असत. देशपांडे यांचे लेखन अतिशय सडेतोड असे. स्पष्टवक्तेपणा हा त्यांचा स्थायिभाव होता. त्यामुळे अकारण कोणाचे देव्हारे माजविणे आणि त्यायोगे आपले काही साधणे हे धों. वि. देशपांडे यांना जमण्यासारखे नव्हते. मराठीप्रमाणे इंग्रजी आणि संस्कृत साहित्याचाही त्यांचा व्यासंग होता. 'महाभारत आणि गीता : व्यक्तिनीती की समूहनीती ?' हा त्यांचा ग्रंथ या व्यासंगाचा साक्षीदार ठरतो. 'मला दिसलेली नाटके', 'जी. एं.च्या कथा : एक अन्वयार्थ', 'मर्ढेकरांची कविता : एक अभ्यास' ह्या ग्रंथांनी धों. वि. देशपांडे ह्यांना जाणकार आणि मर्मज्ञ समीक्षक म्हणून प्रतिष्ठा प्राप्त करून दिली.

त्यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन.

**– वि. स. वाळिंबे**



अनुक्रमणिका






गोविंद तळवलकर

# लेखक पं. नेहरू

पं. नेहरूंच्या अगोदरचे व नंतरचे पुढारी लक्षात घेतले तर, त्यांच्यापैकी अनेकांचे लेखसंग्रह आहेत वा भाषणांचे संग्रह आहेत. काहींची आत्मचरित्रे आहेत. न्यायमूर्ती रानडे यांनी इतिहास, समाजकारण, धर्मकारण आणि अर्थकारण यांवर विपुल लिहिले आहे. नामदार गोखले यांच्या भाषणांचे तीन खंड आहेत. लोकमान्य टिळकांच्या अग्रलेखांच्या संग्रहाप्रमाणेच गीतारहस्य, आर्यांचे मूलस्थान इत्यादी ग्रंथ आहेत. महात्मा गांधींचे लिखाण अनेक खंडांत आहे. स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या आत्मचरित्राप्रमाणेच त्यांची नाटके, राजकीय आणि ऐतिहासिक लेख आणि कवितांचे संग्रह आहेत. राजाजींनी रामायण आणि महाभारतावरही लिहिले आहे. सरदार पटेलांना लिहिण्याचा कंटाळा होता. त्यांचे पत्रसंग्रह आहेत. डॉ. राजेन्द्रप्रसाद यांच्या पत्रांप्रमाणेच पाकिस्तानविषयीचा त्यांचा ग्रंथ आधारभूत मानला जातो. डॉ. आंबेडकरांच्या लिखाणाचे दहा-बारा खंड झाले आहेत. ही यादी आणखी लांबवण्याचे कारण नाही. ती दिली ती आपले एके काळचे पुढारी हे आचार आणि विचारनिष्ठ होते हे दाखविण्यासाठी.

नेहरूंनी अखंड राजकीय जीवन व्यतीत केले आणि सोळा-सतरा वर्षे ते पंतप्रधान होते. असे असून पंतप्रधान म्हणून त्यांच्या पत्रांचे आणि भाषणांचे संग्रह सोडले, तरीही त्यांचे लिखाण विपुल आहे. आत्मचरित्र, जगाचा इतिहास, भारताचा शोध, युनिटी ऑफ इंडिया हा लेखसंग्रह हे आहेत. याशिवाय बंच ऑफ लेटर्स आणि आपल्या कन्येला लिहिलेल्या पत्रांचे नव्याने बाहेर आलेले दोन संग्रह आहेत. बऱ्याच राजकारणी लोकांच्या लिखाणाची प्रेरणा ही तात्कालिक स्वरूपाची असते. पण नेहरू हे सावरकरांप्रमाणे विषयाच्या प्रेमाने लिहिताना दिसतात. त्यांना विचार आणि शब्द यांचा मोह पडतो वा त्यांचे त्यांना आकर्षण वाटते, म्हणून त्यांनी लेखणी उचलली असे दिसून येईल. तसे पाहिले तर, नेहरू कितीतरी भाषणे देत, समुदायात मिसळत. या दृष्टीने त्यांना बहिर्मुख म्हणता येईल. पण नेहरूंचे आणखी एक रूप आहे आणि ते आहे अंतर्मुख. यामुळे ते चिकित्सा करतात. आपल्या आणि इतरांच्या आचाराची आणि विचारांची तपासणी करतात. आपल्या आणि जगाच्या इतिहासाची तपासणीही ते अनेकदा कठोरपणे करताना दिसतात. हे अंतर्मुखतेशिवाय शक्य नाही. बऱ्याच वेळा तटस्थपणे केलेली ही मीमांसा असते. नेहरूंचा भावनाप्रधान स्वभाव पाहता ही तटस्थता आश्चर्यकारक वाटते.



अनुक्रमणिका

लिखाणासंबंधी वा साहित्यासंबंधी नेहरूंची भावना काय होती, याचे उत्तर ३५ साली त्यांनी तुरुंगातून इंदिरेस लिहिलेल्या एका पत्रात मिळते. ते हिंदी लेखकांबद्दल लिहितात, 'फार थोडे हिंदीचे लेखक भाषेच्या सौंदर्याकडे, शब्दाच्या सौंदर्याकडे आणि अर्थाकडे लक्ष देतात. जडजंबाल आणि संदिग्ध भाषेच्या मोहात ते गुरफटतात. फारच थोडा नेमकेपणा त्यांच्या लिखाणात असतो आणि म्हणून नेहमी प्रामाणिकपणाची उणीव आढळते. साधेपणा आणि प्रामाणिकपणा, तळमळ यांतून खरी शैली तयार होते, याची त्यांना कल्पना नाही. आणखी एक दोष म्हणजे आधुनिक जागतिक साहित्य आणि विचार यांची ओळख नसणे.' आधुनिक विचार आणि साहित्य यांची नेहरूंना उत्तम जाणीव होती आणि ते केवळ शब्दांचे जंजाळ उभे करण्याच्या कधीच नादी लागले नाहीत. शब्द आणि विचार यांचे सौंदर्य त्यांना आकर्षक वाटत होते. लेख असो वा काँग्रेस कार्यकारिणीचा ठराव असो, अचूक शब्द वापरण्यावर नेहरूंचा कटाक्ष होता. त्यांचे स्वतःचे व्यक्तित्व पारदर्शक होते, हे त्यांचे टीकाकारही मान्य करीत आले आहेत. या पारदर्शक व्यक्तित्वामुळे ज्या प्रामाणिकपणाची अपेक्षा ते लेखकांकडून करतात त्याचा प्रत्यय आपल्याला त्यांच्या लिखाणात येतो. लेखकास जो चौकसपणा हवा, त्याला अनेक गोष्टींबाबत जी उत्सुकता हवी ती नेहरूंपाशी अखेरपर्यंत होती आणि त्यांच्या वाचनाचे आणि लिखाणाचे विषय पाहिल्यावर ते अधिक जाणवते.

आधुनिक विचार आणि साहित्य यांची ओळख करून घ्यावयाची तर वाचन हवे. कारावासामुळे नेहरूंना बरीच वर्षे आपल्या मनाप्रमाणे आणि मनसोक्त वाचता आणि लिहिताही आले. पण हा त्यांचा केवळ वेळ घालवण्याचा छंद नव्हता. इतके धावपळीचे आणि जबाबदारीचे जीवन जगत असताना रोज काही ना काही वाचल्याशिवाय त्यांचा दिवस गेला नाही. टी.व्ही. इत्यादीमुळे वाचावयास वेळ मिळत नाही अशी तक्रार काही जण करतात, तेव्हा त्यांना मी नेहरूंचे उदाहरण देतो. त्यांच्यापेक्षा तर कोणाचे जीवन इतके व्यस्त नाही. नेहरूंचे ग्रंथप्रेम, त्यांचे वाचन यांसंबंधी त्यांच्या पत्रांतून माहिती मिळू शकते. त्यांच्या स्वतःच्या लिखाणाची प्रेरणा काय, त्यांच्यावर कोणते वा कोणत्या ग्रंथांचे संस्कार झाले हे सर्व या पत्रांतून व्यक्त झाले आहे. लेखकास स्वतःच्या लिखाणाशिवाय काही वाचण्याची गरज नसते, अशी अनेकांची समजूत आहे. नेहरूंची ती नव्हती. त्यांच्या वाचनाचे विषय अनेक होते. इतिहास, अर्थशास्त्र, विज्ञान, तत्त्वज्ञान, राज्यशास्त्र, काव्य, नाटके, कादंबऱ्या, प्रवासवर्णने असे एकापेक्षा एक विषय होते. वनस्पती आणि प्राणिशास्त्राविषयी पुस्तके वाचल्याचे उल्लेख आहेत. अर्थातच या सर्वांचा नेहरूंच्या लिखाणावर प्रभाव पडला आहे.

तेहतीस साली आपल्या कन्येला लिहिलेल्या एका पत्रात त्यांनी ग्रीक शोकांतिका आणि सुखांतिका यावर लिहिले आहे. तसेच त्यांनी उत्तम इंग्रजी आणि फ्रेंच कादंबऱ्या वाचण्याची शिफारस केली आहे. ते लिहितात, 'उत्तम वाङ्मयाची एक विचित्र मोहिनी



अनुक्रमणिका

असते. ते आपल्याला ताजेतवाने करते आणि दिलासाही देते. आपण चांगल्या पुस्तकांशी मैत्री करू, तेव्हा हळूहळू ही मोहिनी पडू लागते. आपल्याला जेव्हा या मोहिनीची जाणीव होते, तेव्हा एक आश्चर्यकारक जग आपल्याला मोकळे होते. पुस्तके आपल्याला कधी दगा देत नाहीत. काळामुळे वा बदल झाला म्हणून त्यांनी दगा दिला असे होत नाही. मला दुसऱ्या कशापेक्षाही पुस्तकांनी सर्वांत अधिक आनंद दिला आहे.' आनंदभवनमधील ग्रंथालयात बसून आपण लिहीत आहोत आणि ही जागा आपल्याला केवळ बसण्यासाठीही आवडते, पुस्तकांचा गराडा आहे आणि आपण वाचीत वा लिहीत बसलो आहोत, इतकेच नव्हे, नुसते बसलो आहोत, ही कल्पनासुद्धा आपल्याला आनंददायी वाटते, असे नेहरू आणखी एका पत्रात लिहितात. वृत्तपत्रे, नियतकालिके यांतून येणाऱ्या जाहिराती आणि परीक्षणे पाहून नेहरूंनी अनेकदा पुस्तके मागविलेली आढळतील. कित्येक वेळा अशा पुस्तकांची मागणी मुंबईतील विक्रेत्यांकडे नोंदवावी, तर त्यांना त्याची कल्पनाही नसे. या पुस्तकांच्या प्रकाशनाची माहिती आहे कुठे, असा प्रश्न हे विक्रेते विचारीत. आजही असाच अनुभव येतो. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की, इंदिरा गांधीही प्रारंभापासून ग्रंथप्रेमी होत्या. पिता आणि कन्या यांच्या पत्रव्यवहारातून हे जे स्वरूप दिसते ते नमूद करण्यासारखे आहे. इंग्रजीप्रमाणे फ्रेंच पुस्तकांचे उल्लेख आहेत. एकदा चाळीसवर फ्रेंच पुस्तके हाती आल्याचे नेहरू आपल्या पत्रात कळवितात. नेहरूंच्या पुस्तकांत आणि पत्रांत अनेक काव्यपंक्ती दिलेल्या दिसतात. त्यांतील बऱ्याच त्यांना पाठ होत्या. कविता वा साहित्याच्या बाबतीत आपण काहीसे जुन्या वळणाचे आहोत, अशी कबुली त्यांनी दिली आहे. त्यांना जुन्या कविता पाठ होत्या आणि वाल्टर द ला मेर हा त्यांच्या काही आवडत्या कवींतील एक होता. शेक्सपियरचा त्यांच्यावर बराच प्रभाव होता आणि अनेकदा त्यांनी त्याच्या पंक्ती उद्‌धृत केलेल्या दिसतात. अहमदनगरच्या कारावासात 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' लिहिले, तेव्हा त्याच्या प्रारंभी शेक्सपियरच्या ओळी आहेत. 'मी जेव्हा स्वतःच्या मनाशी विचार करतो, तेव्हा माझ्या मनात भूतकाळ उभा राहतो,' अशा अर्थाची ती वाक्ये आहेत. मन जेव्हा विचलित झाले असेल वा विषण्णता आली असेल, तेव्हा त्यावर अभिजात वाङ्मयाच्या वाचनासारखे दुसरे काही औषध नाही, असे नेहरूंनी आपल्या कन्येला लिहिले आहे. आवडलेल्या साहित्यकृतींसंबंधी त्यांनी थोडक्यात पण मार्मिक विवेचन केले आहे. व्हर्जिनिया वूल्फ या लेखिकेची 'टु द लाइटहाऊस' ही कादंबरी वाचल्यावर त्यांनी इंदिरा गांधींना पत्रात लिहिले की, "व्हर्जिनिया वूल्फचे जेवढे अधिक लिखाण मी वाचतो, तसे ते मला अधिकच आवडू लागते. तिच्या लिखाणात काही जादू आहे, काही तरल असे आहे. वाहत्या पाण्यासारखे तिचे लिखाण प्रवाही आहे आणि पहाडातील सरोवराचे पाणी जसे खोल आणि नितळ असते, तशी तिची शैली आहे.'

नेहरूंच्या वाचनाची पद्धती कशी होती? कारावासात त्यांनी अनेक विषयांवरील










पुस्तके वाचून काढली. काही वेळा त्यांनी त्यांची टिपणेही केली. एखादे पुस्तक लिहावयाचे असल्यास विषयानुरूप त्यांनी पद्धतशीर वाचन केले. 'युनिटी ऑफ इंडिया' हा नेहरूंच्या लेखांचा संग्रह आहे. त्यांतील एक लेख आहे मुंबई ते लखनौ या रेल्वे प्रवासाबद्दल. 'रेल्वेमधील सुटी' अशा मथळ्याच्या या लेखात आपण कोणती पुस्तके वाचली, याचे मोठ्या प्रेमाने नेहरूंनी वर्णन केलेले आढळेल. त्यांनी प्रथम स्टीफन झ्वाइगची 'लेटर फ्रॉम अॅन अन्नोन वूमन' ही कादंबरी वाचली. ही छोटी कादंबरी वाचून संपविली तो मध्यरात्र झाली होती. सकाळी सर्व आन्हिके पार पाडल्यानंतर करी या लेखकाचे 'फेडरल युनियन' हे पुस्तक चाळले आणि डी. एन. प्रिट यांचे 'लाइट ऑन मॉस्को' हे पुस्तक नेहरूंनी वाचून काढले. त्यातला काही भाग त्यांनी अगोदर वाचला होता. मग एच. जी. वेल्स यांच्या लेखसंग्रहातील काही लेख पाहिले. त्यानंतरचे पुस्तक आहे ते 'डेन्टॉन्स् डेथ' हे फ्रेंच क्रांतीच्या काळावरील नाटक. डेन्टॉ हा या क्रांतीच्या पहिल्या काळात दहशतवादाचा पुरस्कर्ता होता. पण अतिरिक्त रक्तपात होत असल्याचे पाहून त्याचे मत बदलले. ही शोकांतिका या नाटकात अत्यंत प्रभावीपणे वर्णन केली आहे. हे नाटक वाचून संपविल्यावर नेहरू एका फ्रेन्चाच्या आत्मचरित्राकडे वळले.

जातिवंत लेखक हा उत्तमोत्तम वाङ्मय वाचण्यासाठी वा अभ्यासण्यासाठी उत्सुक असतो, तसाच तो कलावंत, लेखक इत्यादींच्या सहवासाचाही भोक्ता असतो. त्यांची तो कदर करतो. नेहरू कला, साहित्य इत्यादी क्षेत्रांतील नामवंतांच्या कलागुणाची मनापासून कदर करीत. अर्नोल्ड टॉयनबी यांनी दोन आठवणी दिल्या आहेत. एकदा त्यांचे दिल्ली विद्यापीठात व्याख्यान नेहरूंनी ठरविले होते. त्यांच्या स्वागतासाठी नेहरू अगोदरपासून हजर होते. टॉयनबी यांना येण्यास उशीर होऊ लागला. त्यांच्या येण्याची वेळ टळली, तेव्हा नेहरू अस्वस्थ झाले. दिल्ली विद्यापीठाच्या मार्गावर गर्दीमुळे वाहतूक मंद गतीने चालली होती. तेव्हा नेहरू आपले पंतप्रधानपद विसरून गाडी काढून निघाले आणि वाहतुकीच्या गोंधळात सापडलेल्या टॉयनबींना घेऊन आले. दिल्लीतच आपल्या दुसऱ्या एका व्याख्यानाला नेहरू अगदी आयत्या वेळी गाजावाजा न करता कसे येऊन बसले होते, हेही टॉयनबी यांनी नमूद केले आहे. सुब्बलक्ष्मी यांच्या गाण्याच्या कार्यक्रमाला नेहरूंना बोलावले होते आणि अध्यक्षपद त्यांना देण्यात आले. नेहरूंनी अगदीच लहान भाषण केले. ते म्हणाले, "मी एक साधा पंतप्रधान आहे, तर सुब्बलक्ष्मी या संगीताच्या क्षेत्रातील महाराणी आहेत. तेव्हा अध्यक्ष म्हणून मी काय बोलणार ?" सुब्बलक्ष्मींच्या त्या गाण्याप्रमाणे नेहरूंचे हे भाषणही अविस्मरणीय ठरले. कलावंतांची कदर करावी ती ही अशी. अनेक नामवंत लेखकांशी त्यांचा व्यक्तिगत स्नेह होता. उदाहरणार्थ, रोमा रोलाँ, अर्नस्टोलर, स्टीफन स्पेन्डर, नबकॉव्ह तर त्यांच्याकडे येऊन राहत. एडवर्ड थॉम्पसन या कवीचा आणि त्यांचा नियमित पत्रव्यवहार होत असे. ४२ च्या आंदोलनाच्या काळात नेहरूंना स्थानबद्ध

केल्यानंतर थॉम्पसन यांनी आपला कवितासंग्रह त्यांना देण्यासाठी म्हणून व्हॉइसरॉय वेव्हेल यांच्याकडे धाडला होता. तो नेहरूंकडे पाठविताना वेव्हेल यांनी स्वतः संपादित केलेला 'अदरमेन्स फ्लॉवर' हा कवितांचा संग्रहही धाडला. पंतप्रधान झाल्यावर नेहरूंनी बर्नार्ड शॉ यांना पत्र लिहिले होते. विद्यार्थिदशेपासून आपल्यावर शॉ यांच्या लिखाणाचा कसा प्रभाव पडला होता हे सांगून, त्यांनी लंडनच्या मुक्कामात शॉ यांच्या गावी जाऊन भेटण्याची इच्छा व्यक्त केली होती. अशी भेटही झाली. ते पेन संघटनेचे अध्यक्ष होते आणि हंगेरी इत्यादी देशांत कम्युनिस्ट राजकर्त्यांनी लेखकांचा छळ सुरू केला, तेव्हा त्या सरकारांना पत्र धाडून नेहरूंनी लेखकांना नीट वागणूक देण्याची सूचना केली होती. पास्तरनाक यांना नोबेल पारितोपिक मिळाले, तेव्हा ते घेण्यासाठी स्टॉकहोमला जाण्यास रशियन सरकारने बंदी केली. नेहरूंनी क्रुश्चॉव यांना पत्र लिहून पास्तरनाक यांना अडवू नये, यामुळे सोव्हिएत युनियनची बदनामी होते, असा अभिप्राय दिला. पुढे नेहरूंनी पास्तरनाक यांना उत्तम चामड्याच्या वेष्टनातील एक सुंदर घड्याळ भेट म्हणून पाठविले. पास्तरनाक यांनी याबद्दल आभार मानणारे मोडक्या तोडक्या इंग्रजीतील पत्र अमिया चक्रवर्ती यांना दिले. रशिया सोडून जाण्याचा विचार पास्तरनाक एकदा करीत होते, तेव्हा आपण देश प्रथम सोडू आणि नेहरूंच्या मदतीने तुलाही बोलावून घेऊ, असे त्यांनी आपल्या प्रेयसीला सांगितले होते. तिने हे आत्मचरित्रात नमूद केले आहे. आन्द्रे मार्लो हे प्रसिद्ध फ्रेंच लेखक आणि कलेचा इतिहास लिहिणारे समीक्षक. त्यांनी 'अॅन्टी मेम्वॉयर्स' म्हणून एक पुस्तक लिहिले आहे. नेहरूंबरोबरील चर्चेने या पुस्तकाची बरीच पाने अडविली आहेत. यात इतिहास, प्राचीन इतिहास, शिल्प, तत्त्वज्ञान असे अनेकविध विषय आले आहेत.

अशा रीतीने केलेले मनसोक्त वाचन आणि पंडितमैत्री यांचा प्रभाव नेहरूंच्या लिखाणावर पडला आहे. यात आत्मपर वा ज्याला ललित लिखाण म्हणता येईल असे थोडे आहे. 'मुंबईतील मॉन्सूनचा पाऊस,' असा एक त्यांचा लेख आहे. तसेच सुरमा खोऱ्यातील प्रवास, काही प्रवासवर्णनात्मक लेख आणि अखेरीस आत्मचरित्र असे जे काही आहे ते आत्मपर आहे. त्यांचा एक लेख विशेष गाजला आणि चर्चेचा विषय ठरला. हा आत्मपर म्हणण्यापेक्षा आत्मपरीक्षणात्मक होता. 'चाणक्य' या नावाने त्यांनी स्वतःच मॉडर्न रिव्ह्यूत तो लिहिला होता. नेहरू हे तेव्हा लोकप्रियतेच्या लाटेवर होते आणि त्या वेळी लिहिलेल्या या लेखात हा माणूस लोकांच्या अतिरिक्त प्रेमामुळे अहंकारी बनेल आणि कालांतराने तो सीझरसारखा हुकूमशहा होईल, असा इशारा देत लेखाच्या अखेरीस आम्हाला सीझर नको असे बजावले आहे. अंतर्मुखतेशिवाय अशा प्रकारचा लेख कोणी लिहिणे शक्य नाही. स्वतःत रमल्याशिवाय आत्मचरित्र हा प्रकार रंगविता येत नाही असे म्हटले पाहिजे. नेहरूंचे आत्मचरित्र अत्यंत गाजले, अनेक भाषांत त्याची भाषांतरे झाली. पण नेहरूंनी स्वतःच म्हटले आहे की, त्यात 'स्व' कमी आहे. आपण आपल्या जीवनात दुसऱ्यांना फार डोकावू देऊ इच्छित नाही,

आपला तो स्वभाव नाही. यामुळे शेवटच्या काही प्रकरणांत आपण बरेच हात राखून लिहिले आहे. आपले रागलोभ, आपल्या भावना या सर्व मोकळेपणी आपण मांडू शकत नाही. विशेषतः सार्वजनिक जीवन जगणारांना सर्व सत्य सांगता येत नाही, सांगून चालत नाही अशी कबुली ते देतात. याउलट काही लेखकांचे स्वतःवर इतके प्रेम असते की, त्यामुळे ते अनेक गोष्टी आपण घडवून आणल्या अशी कल्पना करतात. गेल्या काही वर्षांतील मराठी आत्मचरित्रे याची द्योतक असून त्यावरून महाराष्ट्राचा खोटा सांस्कृतिक इतिहास लिहावयाचा असल्यास लिहिता येईल आणि त्यावर पीएच.डी.ही मिळवता येईल.

नेहरू आत्मपरीक्षण करीत असल्यामुळे त्यांना अनेक वेळा प्रश्न पडणे साहजिक होते. म्हणून सांची येथे बौद्ध परिषद झाली असता ते आपल्या भाषणात म्हणाले, "मी काही संदेश देण्यास आलो नाही, तर स्वतःचाच शोध घेण्यासाठी आलो आहे. या विदीर्ण आणि विचित्र जगात मी एक भांबावलेला गृहस्थ आहे. मला काही प्रकाश दिसत नाही आणि म्हणून मी अडखळतो. माझ्यात काय कमी आहे, याचा शोध मी घेतो आणि माझ्या लोकांना माझ्याकडून काय हवे याचा तपास घेतो."

कोणत्याही व्यक्तीचे एकरंगी चित्र काढता येत नाही आणि काढणे बरोबरही नाही. नेहरू हे एका बाजूने अंतर्मुख आणि दुसऱ्या बाजूने बहिर्मुख होते. तसेच इंग्लंडमध्ये अठरा वर्षे शिक्षणाच्या निमित्ताने राहिल्यामुळे त्यांच्यावर पाश्चात्त्य संस्कार झाले होते. आत्मचरित्रातच त्यांनी लिहिले आहे की, काही वेळा स्वदेशातच आपण परके आहोत असे वाटते. आपण जीर्ण होत आहोत, आपली विचारशक्ती कुंठित होत असल्याची जाणीव होते. मग युरोपात काही काळ घालवावासा वाटतो. तिथे जाऊन आल्यावर शरीर आणि मन ताजेतवाने होते. युरोपातील वैचारिक वातावरणाचा हा परिणाम असतो. हेच नेहरू गंगेचा अखंड प्रवाह, हिमालय, भारताचा प्राचीन इतिहास आणि तो व्यक्त करणारे शिल्प आणि त्याहीपेक्षा या देशातील हजारो लाखो लोक यांपासून स्फूर्ती घेतात. भारतभर त्यांनी अनेक दौरे केले. काही तर अगदी झंझावाती होते. एकदा तेवीस तास दौरा आणि दौऱ्यातील भाषणात गेल्याचे त्यांनी लिहिले आहे. अशा दौऱ्यात खेड्यापाड्यांतील लाखो लोक जमत आणि त्यांच्या चेहऱ्यावरून आणि त्यांच्या डोळ्यांत आपल्याला भारताचे दर्शन होते, या प्राचीन देशाचा इतिहास एखाद्या चित्रपटाप्रमाणे आपल्यापुढून जातो, असे ते डिस्कव्हरीत म्हणतात. मी या दुनियेत आहे, पण दुनियेचा नाही, बाजारात आलो असलो तरी काही खरेदी करावयास आलो नाही, असे गालीब म्हणतो. समुदायात मिसळूनही स्वतःच्या भावनांचे असे विश्लेषण करणाऱ्या नेहरूंची स्थिती अशी असावी असे मला वाटते.

अमूर्त असा काळाचा पट, अनेक विचार आणि कल्पना यांचे आकर्षण नेहरूंना होते. पण या सर्वांचा विचार ते व्यक्तीच्या अनुषंगाने करतात. निव्वळ विचारांच्या विश्वात वावरत असताना त्यांना मूर्त स्वरूपाचा विसर पडत नाही. गिबनने रोमच्या साम्राज्याच्या ऱ्हासाचा

इतिहास लिहिला आणि तो लिहिण्यापूर्वी ख्रिस्ती धर्मगुरूंचा एक तांडा त्याला दिसला आणि त्याच्याकडे पाहत असताना रोमच्या साम्राज्याच्या ऱ्हासाचा चित्रपट त्याच्या डोळयापुढून गेला. नेहरूंनी 'ग्लिम्पसेस ऑफ वर्ल्ड हिस्टरी' लिहिले किंवा 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' लिहिले, तेव्हा त्यांना विशाल काळाचा पट मोह घालीत होता. पण ज्या प्रमुख व्यक्तींनी आपला ठसा काळावर उमटविला त्यांची आठवण ते विसरत नाहीत. या दोन्ही ग्रंथांत म्हणून अनेक प्रभावी व्यक्तींच्या कार्याचा आणि व्यक्तित्वाचा वेध घेतलेला आहे. अगदी गौतम बुद्धाच्या मूर्तीकडे पाहतानाही त्या मिटलेल्या डोळ्यांत आणि अत्यंत शांत अशा चेहऱ्यावर त्यांना चैतन्याचा साक्षात्कार होतो. ती मूर्ती आहे असे वाटतच नाही. फ्लॉरेन्स हे केवळ सुंदर शहर म्हणून ते ओळखत नाहीत. नेहरू लिहितात, 'सर्व युरोपभर उलथापालथ होत असतानाच वैचारिक क्रांती– रेनेसान्सचा– जन्म झाला. तेराव्या आणि चौदाव्या शतकाने फ्लॉरेन्सने डांटे, प्लुटार्क अशा महान व्यक्तींना जन्म दिला होता. या सुंदर शहरातून जात असताना तुम्हाला तिच्या महान पुत्रांच्या छाया पडलेल्या आढळतील. आर्मो ही सुंदर नदी प्राचीन काळच्या पुलांखालून वाहताना पाहिली की, तुमच्यावर तिची मोहिनी पडते आणि भूतकाळ तुमच्यासमोर जिवंत होऊन उभा राहतो. डांटे आपल्या जवळून जातो आणि त्याची प्रेयसी बेट्रिस तीही जाते. ती निघून गेल्यावर तिच्या मागे अत्तराचा मंद सुगंध येतो. रस्त्यातून तो पाहा, लिओनार्दो चालला आहे. जीवन आणि निसर्ग यांचे गूढ काय, याच्या विचारात तो अगदी गढून गेला आहे.-' नेहरू स्वतःच म्हणतात की, आपण इतिहासकार नाही आणि ग्लिम्पसेसचे संपादन एखाद्या इतिहासकाराने करून त्यातील चुका दुरुस्त कराव्यात, असे त्यांनी प्रस्तावनेत म्हटले आहे. पण त्यांनी हे जे आणि ज्या प्रकारे लिहिले आहे त्यामुळे इतिहासाबद्दल गोडी निर्माण होईल आणि आपणही काळाच्या या विशाल पटाचा विचार करू लागू यात शंका नाही.

जिथे फ्लॉरेन्सचे नेहरू इतके काव्यमय वर्णन करतात तिथे त्यांच्या आवडत्या काश्मीरचे कसे करतील ? एखाद्या अतीव सुंदर स्त्रीचे सौंदर्य हे अमानवी आणि मानवी अभिलाषेच्या पलीकडचे असते तसे काश्मीरचे सौंदर्य असल्याचे नेहरू सांगतात. काश्मीरच्या नद्या, ओढे आणि खोरी यांमुळे त्याचे सौंदर्य हे स्त्रीचे आहे असे वाटते, तर तेथील पहाड हे पुरुषी सौंदर्याचे द्योतक आहेत, असेही त्यांनी म्हटले आहे.

अशी अनेक उदाहरणे देता येतील. मी जे नेहरूंच्या लिखाणातील उतारे दिले आहेत, ते मुळातील इंग्रजीचे साधारणपणे केलेले भाषांतर आहे. नेहरूंच्या इंग्रजी शैलीचेही एक वेगळे सौंदर्य आहे. अगाथा ख्रिस्तीबद्दल चर्चिलने म्हटले आहे की, लाखो लोकांना मंत्रमुग्ध करणाऱ्या या लेखिकेचे समाजावर उपकार आहेत. युद्धकाळात चर्चिल यांनी लोकांना असेच मंत्रमुग्ध केले होते. त्यांची भाषणे अविस्मरणीय ठरली. लोकांना मंत्रमुग्ध करण्याचे, अविस्मरणीय अशी शब्दरचना करण्याचे सामर्थ्य नेहरूंपाशी होते.










काही पुस्तकांची, भाषणांची वा लेखांची पहिली वाक्ये अविस्मरणीय ठरली आहेत. 'माझे नाव घनःशाम' या वाक्याने 'भावबंधन' नाटकाला सुरुवात होते आणि पुढच्या शोकांतिकेची सूचना मिळते.

All happy families are happy alike, unhappy family is unhappy in its own way

या 'ॲना कॅरोनिना'तील प्रारंभीच्या वाक्याने किंवा

It was the best of time, it was the worst of time

या 'टेल ऑफ टू सिटिज' मधील वाक्याने पुढील शोकांतिकेची कल्पना येते.

made a tryst with destiny

हे स्वातंत्र्य येताना केलेले भाषण असो किंवा महात्मा गांधींच्या खुनानंतर

Light has gone out of our lives

हे भाषण असो, त्यांची ही पहिली वाक्ये अविस्मरणीय ठरली आहेत. त्या त्या वेळी या भाषणांचा प्रभाव पडायचाच आणि आजही या प्रकारची भाषणे त्या काळात घेऊन जातात. धरणे, कारखाने यांना विकासाची मंदिरे म्हणून केवळ नेहरूच संबोधू शकत.

अखेरीस लेखक म्हणून नेहरूंचा विचार करताना व्यक्ती म्हणून, माणूस म्हणून त्यांचा प्रभाव पडतो. ही व्यक्ती कशी आहे? रवीन्द्रांनी नेहरूंचे आत्मचरित्र वाचल्यावर लिहिलेल्या पत्रात ज्या भावना व्यक्त केल्या आहेत, त्याच सांगून या विवेचनाचा शेवट मी करू इच्छितो. रवीन्द्रनाथ लिहितात, 'मी नुकतेच तुमचे महान पुस्तक वाचून संपविले. तुम्ही या रूपाने जे यश मिळविले आहे त्यामुळे मी फार प्रभावित झालो आणि मला अभिमान वाटला. सर्व तपशिलाच्या मागून मानवतावादाचा एक प्रवाह वाहत आहे आणि तो अनेक घटनांच्या पलीकडे आपल्याला लेखकाकडे नेतो. ही व्यक्ती तिच्या कार्यापेक्षाही मोठी आहे आणि तिच्या भोवतालच्या वातावरणापेक्षाही अधिक खरी आहे.'

(महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वर्धापन दिनी (२७ मे १९९३) केलेल्या भाषणाच्या आधारे)

(महाराष्ट्र टाइम्स, दादाभाई नवरोजी रस्ता, मुंबई ४००००१.)

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

### नवे आजीव सदस्य (एप्रिल-जून १९९३)

### (पुण्यातील)

सौ. कुऱ्हाडे तारामती नामदेव, नानिवडेकर रवींद्र शंकर, सौ. घुडे आशालता हेमंत, कु. कोळपकर प्रियांजली चंद्रसेन, कलवडे वसंत कमलाकर, श्रीमती गोखले प्रभा गोविंद, शिंदे मिलिंद विठ्ठल, पिंगळे सुनिशा आनंद, प्रा. शेख मुजफ्फर सलीम, सौ. बवरे संध्या सीताराम, सौ. कोतवाल माणिक विजय, केळकर शिरीष वसंत.

---

**डॉ. मंदा खांडगे**

*कवीच्या गावा जावे*

# पद्माताईंच्या गावी

पद्माताई गोळे पूर्वाश्रमीच्या पद्माराजे पटवर्धन.

*आम्ही महाराष्ट्र कन्या      नका जाऊ कोणी वाटे*
*हिरव्या काकणांत आहे      गुप्त तलवारीचे पाते*
*म्हणा कळया या जाईच्या      परी मायभूमीसाठी*
*करु हातांचीही ढाल      बाळ बांधुनिया पाठी*

असं प्रसंगी जाज्वल्य अभिमानाने आपल्या समर्थ शब्दकळेनं व्यक्त करणाऱ्या किंवा

*सत्तेने संन्यस्त असावे हेच जगा शिकविती*

असा सार्थ गौरव 'महानतेचा मानदंड तू' या कवितेतून शिवप्रभूंविषयी व्यक्त करताना शिवाजीमहाराजांविषयी असलेला समर्थ अभिमान. आणि कवितेतलंही खानदानीपण जपताना,

*आम्ही कुलीनांच्या कन्या      चाफेकळया पानाआड*
*मुळी मांडू ना आरास      मुग्धपणे लावू वेड*
*आम्ही कुलवती कन्या      वाद फुकाचा ना घालू*
*शब्द चतुर मोजके      हिरे माणकांशी तोलू*

अशा आपल्या व्यक्तिमत्त्वाला साजेशा काव्यातून व्यक्त होताना पद्माताईंच्या कवितेची जातकुळी वेगळी आहे, हे जाणवत राहतं. आणि जाणवतं, पेशवाईतले पराक्रमी सरदार परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या खानदानी कुळात जन्मलेल्या पद्माताईंनी आपलं खानदानीपण कवितेतही जपलेलं आहे.

आधुनिक मराठी काव्यात आपल्या पृथगात्म प्रेमकाव्यांनी चटकन नजरेत भरणारी, कौटुंबिक गृहचित्रणात सुखी संसाराची चित्रं रेखाटणारी, मनातील भावस्पंदनं जागवणारी, सूक्ष्म व तरल संवेदनक्षमता लाभलेली, स्त्री म्हणून स्त्रीची दोन्ही रूपं- आई आणि प्रेयसी– व्यक्त करताना सौंदर्य आणि सामर्थ्याने अभिव्यक्त होणारी, स्त्रीशक्तीचं प्रतिनिधित्व करताना, स्त्रीच्या अस्मितेचा काव्यात्म पातळीवरील शोध– त्यातून स्त्रीत्वाच्या गाभ्याला केलेला स्पर्श, तिचं होणारं शोषण, तिला करावा लागणारा संघर्ष हे नेटकेपणानं काव्यातनं टिपणारी पद्माताईंची कविता तिच्या विशेष गुणांनी मराठी काव्यात ठाशीवपणे व्यक्त होते.



अनुक्रमणिका



अल्पाक्षरांनी रमणीय बनलेल्या, अतिशय मोजक्या शब्दांत नेटकेपणानं, कलात्मकतेनं मांडणी केलेली कविता आस्वादताना त्यांनी निसर्गातून, अरूपातून, वृक्षवेलींतून, कुटुंबातल्या घटकांतून, सामाजिक आत्मभानातून टिपलेल्या भावोत्कट काव्यात आपण सहप्रवासी बनतो. पद्मताईंच्या कवितेची ही एक मोठी शक्ती मला त्यांची कविता आस्वादताना, अभ्यासताना वेळोवेळी जाणवलीय. अंतःकरणात असलेल्या 'अलौकिका'च्या वेगळेपणाचा सूर म्हणूनही कवयित्रीचं वेगळेपण, एक अलौकिकपण त्यांच्या ठायी आहे. सृष्टीच्या निर्मात्याबद्दलचं कुतूहल विचारवंतांच्या भूमिकेतून, चिंतनात्मक स्वरूपातून, त्यांच्या काव्यांतून झरताना, त्याचा प्रत्यय येतो. मृत्यू, त्याचं ध्यासरूप हाही त्यांच्या अलौकिक जाणिवेचाच एक वेगळा पैलू. प्रियकराच्या स्वरूपात अलौकिकाला व अलौकिकाच्या स्वरूपात प्रियकराला पाहणं हाही त्यांच्या प्रतिभेचा विशेष लखकन जाणवणारा. म्हणूनच अशी पृथगात्म आत्मभावानं शब्दांकित झालेली त्यांची कविता म्हणजे मराठी कवितासृष्टीची अनुपमेय भावलेली.

पद्माताई काव्याच्या क्षेत्रात स्थिरावू लागल्या तो 'रविकिरण मंडळा'च्या भरभराटीचा काळ होता. मंडळातील कवी गाऊन काव्यवाचन करीत. त्याला रसिकांनी चांगली दाद दिली होती. या 'रविकिरण मंडळा'च्या कालखंडापासून आजपर्यंतच्या मराठी काव्याचा प्रवाह व प्रणालींशी रचनेच्या संदर्भातील नातं जोडीतच पद्माताईंची काव्यरचना वाटचाल करताना दिसते. आरंभीच्या काव्यावर तांबे, गोविंदाग्रज, यशवंत या कवींच्या काव्याचा थोडाफार ठसा उमटलेला दिसतो. पण पुढे त्यांची कविता पृथगात्म आत्मभावानं सरसपणे व्यक्त झालीय.

गेल्या सहा दशकांपेक्षाही अधिक काळ सातत्यानं काव्यलेखन करणाऱ्या आणि वयाची ऐंशी ओलांडणाऱ्या संपन्न पण ऋजु व्यक्तिमत्त्वाच्या पद्माताईंचं आजही कवितासखीशी हितगुज पूर्वीइतक्याच जिव्हाळ्याने घडतंय. असं संपन्न व्यक्तिमत्त्व लाभलेल्या पद्माताईंच्या आगळ्यावेगळ्या विचारसरणीचा, तसंच त्यांच्या काव्याच्या वेगळ्या जडणघडणीचा शोध घ्यायचा प्रयत्न मी त्यांच्याशी झालेल्या भेटींतून, गप्पांतून पुष्कळदा केलाही. पद्माताईंची-माझी पहिली भेट झाली ती त्यांच्या शनिवारातील गोळेवाड्यात. पेशवेकालीन वाड्यात. गोळे हे पेशव्यांचे सरदार. हे पद्माताईंचं सासरघर. पद्माताईंच्या आईचं हे माहेर. आज हा वाडा अस्तित्वात नाही. पण मला तो अजूनही आठवतो. १७-१८ वर्षांपूर्वी पाहिलेला तो वाडा म्हणजे पेशवेकालीन बांधकामाचा उत्तम नमुना. त्या वास्तूत मी पद्माताईंना भेटत असे. त्या वेळी मी अर्वाचीन मराठी कवयित्रींच्या काव्याचा अभ्यास करीत होते. त्यानिमित्तानं मी त्यांना त्या घरी भेटायला जात होते. प्रत्येक भेटीत पद्माताईंच्या काव्याइतकंच त्या वाड्याचं आकर्षणही मला असायचं. पुण्यातील पेशवेकालीन वास्तूंवर लेखन केलं, तेव्हा हा वाडा अस्तित्वात नव्हता; याची मला राहून



अनुक्रमणिका






राहून हुरहूर वाटली. त्याचंही वास्तुरूप वर्णन मला माझ्या पुस्तकात करता आलं असतं, तर त्याला एक वेगळं परिमाण माझ्या दृष्टीनं लाभलं असतं. आजही त्या रस्त्याने जेव्हा केव्हा जाणं होतं त्या वेळी त्या जागेवर दिमाखानं उभ्या असलेल्या फ्लॅटच्या उत्तुंग इमारतीकडे लक्ष जातं आणि पूर्वीच्या गोळे वाड्याचं वैभव आठवू लागतं. कालाय तस्मै नमः

पुढे पद्माताई औंध-पाषाण भागात राहायला आल्या आणि आता पाषाणमध्ये त्यांच्या दोन्ही चिरंजीवांनी सुंदरशी वास्तू वांधलीय. त्या वास्तूत आता त्यांची गाठभेट होते. अशा त्यांच्या भेटीतून त्यांच्या कवितेविषयी चर्चा करताना, गप्पा मारताना कितीतरी वेगवेगळे धागे उलगडत जातात, त्यांच्या काव्याचे, भावजीवनाचे, त्यांच्या घराण्याचे, त्यांचे बालपणाचे. अलीकडच्या भेटीत त्यांच्या गप्पांत असतात त्यांच्या बालपणाच्या आठवणी. म्हातारपण म्हणजे दुसरं बालपणच. मग त्या आठवणी येणारच. या बालपणच्या आठवणीतून त्या आपल्याला थेट नेऊन पोहोचवतात तासगावला. तासगाव पुण्यापासून सहा तासांच्या अंतरावर असलेलं सांगली जिल्ह्यातलं २०-२२ हजार वस्तीचं तालुक्याचं गाव. एके काळी पेशवाईतले पराक्रमी सरदार परशुरामभाऊ पटवर्धन यांना मिळालेलं इनाम गाव. पद्माताई याच परशुरामपंतांच्या सहाव्या पिढीतील माहेरवाशीण. पद्माताईंचं बालपण ज्या तासगावात गेलं, तेव्हाचं तासगाव होतं तीन-साडेतीन हजार वस्तीचं गाव. आज या तासगावाला महत्त्व प्राप्त झालंय ते द्राक्षांमुळे. द्राक्षांचे मळेच्या मळे तासगाव आणि आसपासच्या परिसरातून दिसतात. या तासगावच्या पटवर्धन वाड्याचं साक्षात वैभव पद्माताईंनी ऐकवलं, तेव्हा हे गाव आणि पटवर्धनांचा भुईकोट किल्लेवजा वाडा पाहण्याची उत्सुकता निर्माण झाली ती दोन गोष्टींमुळे. एकतर पद्माताईंचा जन्म आणि बालपण या वास्तूतलं आणि हैदर आणि टिपूसारख्या शत्रूलाही धूळ चाळणाऱ्या पेशवाईतल्या पराक्रमी सरदार परशुरामभाऊंचं हे गाव आणि वास्तू. तेव्हा हे तासगाव पाहण्याचे वेध लागले. आणि नेमकं त्याच वेळी कोल्हापूरला जाण्याचं अचानक ठरलं. एखाद्या गोष्टीचे योगही जुळून येतात. कोल्हापूरला जायचं होतं ते दोन लेखांच्या कामासाठी आणि त्याच सुमारास कोल्हापुरात चित्रतपस्वी भालजी पेंढारकरांना जिजामाता विद्वत गौरव पुरस्कार प्रदान करण्याचा सोहळा जयप्रभा स्टुडिओत होता. त्या कार्यक्रमाला उपस्थित राहून भालजींच्या– बाबांच्या त्या सोहळ्याचं दर्शन होणार होतं. आणि मग कोल्हापुरातली कामं उरकून कोल्हापूरमार्गे तासगावला जावं, असा बेत आखूनही झाला.

जून महिन्याची सुरुवात होत होती. वातावरण आल्हाददायक. उन्हाळ्याची तलखी संपलेली. मला ऐन उन्हाळ्यात प्रवास करायला बिलकुल आवडत नाही. त्यामुळे मी प्रवास एक तर हिवाळ्यात तरी करते, नाहीतर पावसाच्या धुंद मस्तीत प्रवास करायला मला पर्वणीच वाटते. कोल्हापुरातलं चार दिवसांचं काम उरकून कोल्हापूरहून अगदी सकाळीच तासगावला जाणारी एस. टी. मिळाली. सकाळी फक्त ही एकच एस. टी. कोल्हापूरहून










तासगावला जाते. असा कोल्हापूरहून प्रवास करण्यात आणखी एक गोष्ट साधली जाणार होती. कोल्हापूरहून तासगावच्या दोन-अडीच तासांच्या प्रवासात लागणारी कृष्णाकाठची सुपीक जमिनीची गावं, शेतशिवारं पाहत पाहत हा प्रवास होणार होता. असा प्रवास मला एकटीनेच करायला आवडतो. शांतपणे आसमंत न्याहळता येतो. जाता जाता प्रवासात तिथली प्रादेशिक वैशिष्ट्यं टिपता येतात आणि तिथला निसर्ग दृक् संवेदनांनी मनमुराद टिपता येतो. हा निसर्ग मोठा साथ देणारा असतो प्रवासात. तो मनावर गारुड करतो आणि प्रवास कसा छान आल्हाददायक होतो.

आदल्या दिवशी पाऊस पडल्याने अगदी सकाळी एस. टी.त बसल्यावर गारवा चांगलाच जाणवत होता. पण हा प्रवासातला गारवा सुखकरही होता. एरवी रोजच्या रुटीनमध्ये आणि कामाच्या व्यापामध्ये असे काही सुखद गारवे हवेहवेसे वाटतात. तेव्हा असा सुखकर गारव्याला अंगावर घेतच प्रवास सुरू झाला. या प्रवासमार्गातला रस्ता काही फारसा चांगला नव्हता, पण त्याकडे विशेष लक्ष द्यायचं नव्हतं. कारण अंतर अवघं अडीच तासांचं. निसर्ग खुणावत होता. आदल्या दिवशीच्या पावसाचं पाणी अंगावर घेऊन वृक्षवेली सतेज झालेल्या दिसत होत्या आणि त्यांवर पडलेल्या कोवळ्या उन्हाच्या प्रकाशात त्यांचा हिरवा तजेला लुभावत होता. पहिल्याच थांब्यावर लागलं वडगाव. कोल्हापूरपासून अर्ध्या तासाच्या अंतरावर. मग भादोलं, शिगाव, बागणी, मग अष्टा. त्या दिवशी काही विशेष उत्सव असावा. अष्टं हे धनगरांची जरा जास्त वस्ती असलेलं गाव. त्यांचा देव विरोबा. विरोबाच्या दर्शनाला धनगरांची गर्दी उसळलेली होती. पुढे अंकलखोप, मग फाट्यावर लागतं औदुंबर. औदुंबर कृष्णाकाठी वसलेलं दत्तात्रयाचं जागृत देवस्थान. अतिशय शांत आणि निसर्गरम्य परिसर. इथून पुढे लागतं भिलवडी. औदुंबर फाट्यापासूनच काळ्या सुपीक जमिनीत डुलणारे ऊस आणि द्राक्षांचे मळे दिसायला लागतात. दुरून द्राक्षांचे मळे पाहायला लागलं की वाटतं, हिरवा पोशाख केलेल्या सैनिकांच्या पलटणीच्या पलटणी एका रांगेत उभ्या आहेत. औदुंबरनंतर लागतं भिलवडी. लोहमार्गाच्या जवळचं हे स्थानक. भिलवडी प्रसिद्ध आहे ते चितळे बंधू मिठाईवाल्यांचं गाव म्हणून. इथेच त्यांचा दुधाचा प्रकल्प आहे. या भिलवडीत सरदार पटवर्धनांचा वाडा आणि शेती. दक्षिण महाराष्ट्रातल्या कृष्णा नदीच्या खोऱ्यातल्या सांगली आणि ह्या गावांचा परिसर हळद, ऊस, तंबाखू, भुईमूग या नगदी पिकांनी समृद्ध असा परिसर आहे. पुरेसा पाऊस असल्याने ज्वारी, बाजरी, भाजीपालाही चांगला होतो. आणि अलीकडे तर द्राक्षाच्या पिकामुळे या भागाला महत्त्व आलंय. भिलवडीच्या पुढे लागतं हजारवाडी. इथं अलीकडेच हिंदुस्थान पेट्रोलियमचा प्रचंड मोठा गॅस प्रकल्प उभारलाय. 'तांबड माती हिरवी राने मन झाले ताजेतवाने' असं काव्यात्म निसर्गलेणं मनीमानसी साठवत गाडी तासगावच्या रस्त्याला लागलीही. सांगलीच्या या परिसरात 'वसंतदादा पाटलांचं सांगली'च्या खुणा

अनेक ठिकाणी जाणवत होत्या. अगदी खत कारखान्यालासुद्धा वसंतदादांच्या नावाची पाटी होती. तासगावात शिरताशिरताच द्राक्षाची शेतंच्या शेतं दृष्टीसमोर येत होती. कृष्णाकाठच्या या सुपीक जमिनीचं दान इथल्या शेतकऱ्यांना लाभलंय. अतिशय संपन्न असा हा कृष्णाकाठचा पट्टा. जत, मिरज, कवठे महांकाळ, खानापूर, शिराळा ही सांगलीतली तालुक्याची गावं आणि तासगाव ही कृषिउत्पादनाची प्रमुख बाजारपेठ. तासगावच्या एस. टी. स्टँडवर उतरण्याऐवजी आधीच्या एस. टी थांब्यावर उतरलं तर तिथून पटवर्धनांचा वाडा अगदी पायी चालत जाण्याच्या अंतरावर आहे, अशी सूचना मिळाली होती. त्यानुसार कंडक्टरला सांगून उतरले. उतरल्यावर थोडी कसरत करतच जावं लागणार होतं. पावसाने सगळीकडे चिखल, रप् रप् होती. उतरल्या उतरल्या कंटक्टरने सांगितल्याप्रमाणे डाव्या हाताला चालायला सुरुवात केली. कोपऱ्यावरून जाणारा रस्ता बाजारपेठेकडे जाणारा असावा. तिथे चौकशी केली, तेव्हा विचारलेल्या माणसाने सांगितलं, 'तुम्ही चाललाय तोच रस्ता पटवर्धनांच्या वाड्याकडे जाणारा. सरळ पुढे जावा.' वाटेत लागलं उजव्या हाताला हटकेश्वराचं मंदिर. हात जोडून नमस्कार केला. पुढे चालताना थोडा चढ जाणवायला लागला. मग लागला वाड्याचा परिसर. थोडं चालत पुढे गेल्यावर डाव्या हाताला वळून उंचच उंच वाड्याची तटभिंत. बापरे किती मोठी ! अडीचशे वर्षांपूर्वीच्या या वाड्याची तटबंदीही बऱ्याच प्रमाणात शाबूत असली, तरी अनेक ठिकाणी ढासळलेलीही पहिल्याच दृष्टिक्षेपात लक्षात आली. नजरेत सामावणार नाही एवढा मोठा परिसर. भव्य दरवाजा. हत्ती जाईल एवढा. देवडीवरच दोन पहारेकरी. तिथून वाड्याचा मुख्य भाग बराच आत होता. त्या पहारेकऱ्यांनी तिथून आत जायला सांगितलं. आता वाड्याचा दर्शनी भाग नजरेसमोर आला. तटबंदी न्याहाळतच वाड्यात प्रवेश केला आणि बेल दाबली. तटभिंतीपासून वाड्याच्या प्रवेशद्वारापर्यंतचं मोकळं आवार. पद्‌माताईंनी सांगितलं होतं, 'इथंच आम्ही आल्या आल्या खो खो खेळत असू. वाड्यावरच मैत्रिणी येत. आम्हाला कुठे जायला परवानगी नसे.' बेल दाबून कोणी येईपर्यंत मला पद्‌माताईंनी सांगितलेल्या त्यांच्या या बालपणच्या आठवणी आठवू लागल्या. वाड्याच्या दरवाजाजवळ उभं राहून तेवढ्या वेळात मी भराभर वाड्याचं निरीक्षण केलंही. उंच जोतं असलेला तो भव्य चौसोपी पाचमजली वाडा. डाव्या हाताला जिना. समोरच देवघराची काळी कातीव चौकट लक्ष वेधून घेत होती आणि उजव्या हाताचा सोप्यावरचा तो मेणा. पद्‌माताई सांगत, त्यांना मेणे गाडीतूनच शाळेत जावं लागे. ह्या अशाच गाडीत बसून पुण्यातही शाळेत जावं लागे. एरवी वटपौर्णिमेला काय ते आईबरोबर त्या इतर बायका व मुलींसमवेत वाड्याच्या बाहेर असलेल्या वडावर जात. तेव्हा आई शालू व दागिने घालून मढलेली असे. आई रस्त्याने जायची तेव्हा तिच्यावर अब्दागिरी धरलेली असे. मला तो मेणा पाहिल्यावर या सगळ्या गोष्टी आठवल्या. सोप्यावर तख्तपोशीला झुंबरं-हंड्या टांगलेल्या. मी न्याहाळत होते. ताशीव खांब. मधलं कारंजं. तेवढ्यात वरच्या



अनुक्रमणिका







मजल्यावरून राजेंद्र पटवर्धनांचा मुलगा निरंजन खाली आला. त्याच्या समवेत जिना चढून मी मोठ्या दिवाणखान्यात प्रवेश केला. मी येणार असल्याचा निरोप मिळाला होता. फक्त कधी येणार ते नक्की माहीत नव्हतं. थोड्याच वेळात बाहेर गेलेले राजेंद्र पटवर्धन आणि त्यांची पत्नी सौ. सितारा यांची ओळख झाली. दुपारची गाडी पकडून मी परत पुण्याला जाणार आहे, असं त्यांना सांगितलं. हातात असलेल्या ५-६ तासांत वाडा, पटवर्धनांचं सुप्रसिद्ध मंदिर आणि तासगावचा परिसर पाहायचा होता.

राजेंद्र पटवर्धन ही परशुरामभाऊ पटवर्धनांची सातवी पिढी. स्वतः राजेंद्र पटवर्धन हे परदेशात उच्च शिक्षण घेऊन आलेले इंजिनिअर. त्यांचे दुसरे भाऊ डॉक्टर असून पुण्यात स्थायिक झाले आहेत. पद्मातांईचे बंधू कै. परशुराम विनायक ऊर्फ भाऊसाहेब यांचे राजेंद्र हे ज्येष्ठ चिरंजीव. सात-आठ वर्षांपूर्वी येथे स्थायिक झाले असून बांधकाम व्यवसाय करीत असून आपल्या वडिलोपार्जित वास्तूचे ऐतिहासिक मूल्य जाणून ते इथे स्थायिक झाले आहेत. वाड्याची जिथे जिथे पडझड झाली आहे, तिथे आधुनिकतेनुसार दुरुस्ती करून हे जुनं बांधकाम जास्त काळ चांगल्या अवस्थेत राहावं याच्यासाठी प्रयत्नशील आहेत. आपल्या पराक्रमी वास्तुपुरुषाबद्दल त्यांना सार्थ अभिमान आहे. त्यांनी अगदी थोडक्या वेळात पराक्रमी परशुरामभाऊंपासून त्यांच्या आजोबांपर्यंतचा इतिहास साक्षात डोळ्यासमोर उभा केला. तो सांगितला नाही, तर पटवर्धन घराण्याचं वैभव जे परशुरामभाऊ त्यांचा पराक्रम तुम्हाआम्हाला केवळ फक्त इतिहासातच वाचावा लागेल. हरभट पटवर्धन हे गणपती पुळ्याजवळील कोतवड्याच्या गणपतीचे उपाध्याय. दोन वर्षं दूर्वांच्या रसावर राहून त्यांनी उपासना केली. गणपतीने दृष्टान्त दिला, 'देशावर जा.' देशावर आल्यावर इचलकरंजीकर घोरपडे सरकार भेटले. त्यांच्या आश्रयाला राहिले. घोरपडे आणि पेशव्यांचे घनिष्ट संबंध असल्याने हरभटाच्या सर्व मुलांना पेशवेदरबारी नोकरीस ठेवलं. पैकी हुशारीने शिक्षण घेतलेल्या रामचंद्र हरभटांचे चिरंजीव परशुराम. परशुराम रामचंद्रांचा जन्म पुण्यास १७४० मध्ये झाला. ते सहा वर्षांचे असताना रामचंद्र हरभट निवर्तले. मग परशुराम पेशव्यांकडे राहिले. इथे कारकुनी शिकले. त्यांचे चुलते म्हणाले, "तुम्ही सैन्यातील बहादुरी शिका." वयाच्या १४ व्या वर्षी ते युद्धशास्त्रात निपुण झाले. श्रीमंत पेशव्यांनी त्यांना लढाईवर पाठवले. वयाच्या १४ व्या वर्षी त्यांनी सावनूर युद्धात पराक्रम केला. युद्धकौशल्यावर खूष होऊन श्रीमंतांनी त्यांना कोरेगाव बक्षीस दिले व त्याबद्दल सुलसन खमस खमसैन मया व आलक छ १२ रबिलाखरची पुत्रपौत्रादी वंशपरंपरेची सनद सन १७५४ मध्ये करून दिली. पेशव्यांची निष्ठा सातारा घराण्याच्या शाहूराजांवर. परशुरामभाऊ त्यांना मानत. ते स्वामिनिष्ठ होते. १७७१ ते ८९ मिरज प्रांत कसबे तासगाव इथली जहागिरी देऊन परशुरामभाऊंना नेमले. पेशव्यांनी स्वारीवर पाठविले की, गणपती पुळ्याचे दर्शन घेऊन स्वारीवर जात. गणपतीचे भक्त. त्यांना दृष्टान्त झाला की, इतक्या दूर येता, तेव्हा










माझेच मंदिर तासगावी बांधा. त्यानुसार त्यांनी १७७९ साली गणपतीचे मंदिर तासगावात बांधले. ते अनेक ठिकाणी हिंडले होते. बांधकामात त्यांना विशेष रस होता. त्यामुळे गदग-होस्पेट इथल्या गोपुरांची प्रतिकृती असलेलं महाराष्ट्रातील दाक्षिणात्य मंदिरांचं वैशिष्ट्य हेरून बांधलेलं हे एकमेव मंदिर म्हणजे परशुरामभाऊंचं गणपतीचं मंदिर. नारायणराव पेशव्यांचा खून झाला. बारभाईचं कारस्थान परशुरामभाऊंना पटलं नाही, म्हणून त्यांना नाना फडणविसांनी अटक करून साताऱ्याला कैदेत ठेवलं. त्यांचा त्यांना मनस्वी धक्का बसला. त्याचा त्यांच्या मनावर परिणाम झाला. पुढे टिपूने हल्ला केला. त्यात कोल्हापूरकर भोसले सामील होते. नाना फडणविसांच्या लक्षात आलं. या कामी आता परशुरामभाऊ पाहिजेत. हैदरलाही नामोहरम करणाऱ्या परशुरामभाऊंचा अतुलनीय पराक्रम त्यांना माहीत होता. तेव्हा त्यांनी परशुरामभाऊंना बंधमुक्त केलं आणि लढाईवर जाण्यास सांगितलं. ते तासगावी आले. १४ सप्टें. १७९९. गणपतीचा रथोत्सव होता. तो पूर्ण करून त्यांनी लढाईवर जाण्याचं ठरविलं. निपाणीवर टिपू हल्ला करीत होता. कर्नाटकात निपाणीजवळ पट्टणकुट्टी गावाजवळ परशुरामभाऊंनी तंबू ठोकला. त्यांची तीन मुलं तीन दिशांना गेली. सगळीकडे कोल्हापूरकर भोसल्यांचा पराभव झाला, तेव्हा कोल्हापूरकरांनी कट करून पट्टणकुट्टीजवळच परशुरामभाऊ गाफील असताना ठाण्यावर हल्ला केला. त्या वेळी ते बुद्धिबळ खेळत होते. निःशस्त्र परशुरामभाऊ व निळोबांवर हल्ला करून त्यांना ठार केले. खर्ड्यावरील स्वारीत, श्रीरंगपट्टमवरील स्वारीत अतुलनीय पराक्रम करणाऱ्या परशुराम भाऊंच्या प्रेताची विटंबना केली. पट्टणकुट्टीजवळच त्यांच्या चिरंजीवांनी त्यांच्यावर अंत्यसंस्कार केले. आणि ज्या निर्घृणपणे आपल्या वडिलांची हत्या कोल्हापूरकरांनी गायकवाडाकरवी केली, त्याचा सहा महिन्यांत अंत करू, अशी शपथ घेतली व ती पुरी केली. एवढंच नाही, भाऊंचा तासगाव कोटातील चंदनी चौकाचा वाडा जळला. गणपती मंदिराच्या गोपुरावरील मूर्तींची नाकं कापली. एका पराक्रमी तेजाचा असा अस्त आपल्याच स्वकीयांनी केला. भाऊंनी धामधुमीच्या काळातही तासगाव येथे काही गोष्टी केल्या. श्रीगणपतीचं पंचायतनाचं दगडी देवालय बांधलं. त्यासमोरील गोपुर व त्या गोपुराची सात मजली इमारत फार प्रेक्षणीय आहे. हे गोपुर ९७ फूट उंचीचं आहे. हाटकेश्वराचा जीर्णोद्धार केला. पुढे भाऊ गेल्यावर त्यांची तीन मुलं मिरज, चिंचवी आणि तासगावी राहिले. रामचंद्र परशुराम यांनी तासगावी वास्तव्य केलं. त्यांच्याच वंशातील गणपत परशुरामांचे चिरंजीव विनायकराव ऊर्फ बाबासाहेब हे पद्मताईंचे वडील. १८५८ साली डलहौसीच्या कारकीर्दीत तासगाव संस्थान खालसा झालं. सांगली आणि मिरज ही संस्थानं राहिली. विनायकरावांच्या पत्नीची बहीण ही सांगलीच्या राजेसाहेबांना दिलेली होती. विनायकराव ऊर्फ बाबासाहेब यांच्या मनात तासगाव हे संस्थानच राहावं असं फार होतं. त्यांना लेखन-वाचनाची खूप आवड होती. त्यांच्या संग्रही खूप पुस्तकं होती. त्यांनी पुनर्जन्मावर

आधारित 'त्रिजन्म परीक्षण' असे एक नाटकही लिहिले होते. पद्मातांईच्याकडे हा वडिलांच्या लेखनाचा वारसा आलेला. वयाच्या ३८ व्या वर्षी बाबासाहेब-- पद्मातांईचे वडील वारले तेव्हा पद्माताई अवघ्या दहा वर्षांच्या होत्या. त्यांच्या आईंनी पाच मुलांना सांभाळून कोर्ट ऑफ वॉर्डस्‌कडे सगळी इस्टेट देऊन सांगलीच्या राजेसाहेबांच्या सांगण्यावरून मुलांना शिक्षणासाठी पुण्यात ठेवलं. पुण्यास जाण्यास त्या काळी बैलगाडीतून चार दिवस घालवावे लागत. राजेंद्र पटवर्धन हा घराण्याचा इतिहास सांगत असताना मी जणू काही त्या काळात जाऊन पोहोचले होते. घड्याळाचा काटा पुढे सरकत होता. भोजन झाल्यावर राजेंद्र पटवर्धनांनी सर्व वाडा हिंडून दाखवला.

आदिलशहाच्या कारकीर्दीतील दुबल सरदाराचा हा वाडा. तासगाव जिंकून १७७५ मध्ये परशुरामभाऊ इथे आले. कोल्हापूरकरांनी वाडा जाळल्याचा उल्लेख वर आहे. नंतर भाऊंनी वाडा परत बांधला. उत्तर दरवाजा २६ फूट उंच, तर पूर्व दरवाजाही २६ फूट उंच. वाड्याची लांबी ४१२ फूट आणि रुंदी ३५७ फूट. ५ बुरूज असलेली तटभिंत. ही मातीत बांधलेली. अत्यंत उंच, भव्य. आता या भिंतीच्या कडेनं गाव वसलं आहे. या वाड्याचा उत्तर दरवाजा भाऊंनी बंद करून पूर्व दरवाजा उघडला होता. पद्मातांईच्या वडिलांनी उत्तराभिमुख दरवाजा परत उघडला. वाड्याचा सोपा ओलांडून आत गेलं की, मोठ्या जेवणावळी बसतील अशी दालनं. त्या दालनांतूनच डाव्या बाजूने मागचा चौक वाडा. दोन चौकी मागच्या वाड्यात अंगण मोठं. इथे खूप झाडी. पद्मातांईनी वर्णन केलेली चाफ्याची, बकुळीची झाडं. इथेच दत्ताच्या पादुका व इतर देव. ह्या झाडाच्या फुलांच्या माळा लहानपणी पद्माताई व मैत्रिणी करत. सणावारी केसात फुलं माळायची. एरवी नाही. त्या चाफ्याचं झाड त्यांच्या जिवाभावाचं. जणू त्याच्याशी असलेलं अतूट नातं त्यांच्या एका कवितेतून व्यक्त झालंय. ती चाफ्याची झाडं आजही पद्मातांईच्या लक्षात आहेत. त्यांतली पांढऱ्या चाफ्याची कोणती आणि लाल चाफ्याची कोणती ?

*चाफ्याच्या झाडा, चाफ्याच्या झाडा*
*का बरं आलास आज स्वप्नात*
*तेव्हाच तर आपलं नव्हतं का ठरलं ?*
*दुःख नाही उरलं आता मनात*
*पानांचा हिरवा, फुलांचा पांढरा*
*रंग तुझा रंगतोय माझ्या मनात*
*केसात राखडी पायात फुगडी*
*मी वेडीभाबडी तुझ्या मनात*
*चाफ्याच्या झाडा, चाफ्याच्या झाडा*
*नको ना रे पाणी डोळ्यांत आणू*

*ओळखीच्या सुरात,*
*ओळखीच्या तालात*
*हदग्याची गाणी नको म्हणू.*

चाफ्याची ती झाडं पाहिली आणि पद्माताईंच्या कवितेतल्या या आर्त ओळी साद घालू लागल्या. जणू त्यांनी सांगितलेल्या माहेरच्या आठवणी, बालपणीच्या आठवणी सजग झाल्या. हा चाफा जसा त्यांच्या जिवाभावाचा तशीच वाड्यातली बाराद्वारीही. पाचव्या मजल्यावरील ही बाराद्वारी. पद्माताईंना इथे बसायला आवडायचं. प्रत्येक दिशेस तीन खिडक्या याप्रमाणे चारी दिशांस खिडक्या. म्हणून ही 'बाराद्वारी.' ही परशुरामभाऊंच्या खलबतखान्याची जागा. इथे उभं राहिलं की अवघं तासगाव दृष्टीस पडतं. इथून दिसतं गणपतीचं मंदिर आणि त्याच्या पलीकडे असलेली परशुरामभाऊंनी लावलेली खास नारळाची बाग. या बाराद्वारीपर्यंत वर चढायचं म्हणजे कसरतच करावी लागते. पण या बाराद्वारीतून खाली डोकावताना वाड्याचा सारा परिसर दृष्टीस पडतो. ज्या वाड्याच्या चौकात पद्माताईंचा भोंडल्याचा खेळ रंगला, जिथे त्यांच्या आजींनी त्यांना गोष्टी सांगितल्या तो चौक. पद्माताईंच्या आजींना लिहायला-वाचायला येत होतं. त्यांना त्या 'थोरल्या आई' म्हणत. त्या या मुलींकडून पाठांतर करून घेत. पद्माताईंची मोठी बहीण पेशव्यांकडे दिली होती. त्यांची वरात हत्तीवरून काढली होती, याची आजही आठवण त्या सांगतात. धाकटी बहीण भाव्यांकडे दिलेली. त्या प्रोफेसर होत्या. वाड्यावर नेहमी कथा-कीर्तनं होत. पद्माताईंची पहिली कविता अशीच स्फुरली. तिची आठवणही त्यांना आहे. वाड्यावर कपाटं पुस्तकांनी भरलेली. ती वाचायला मिळत. वडिलांना नाटकाचं वेड. त्यामुळे पुण्यात गेलं की, बालगंधर्वांची नाटकं पाहायला मिळत. वय लहान होतं, पण नाटकं पाहिलेली. नवनीतातल्या कविता आजींनी पाठ करून घेतलेल्या. पुराणिकबुवा घरी येत. त्यांना संस्कृत शब्दांचा अर्थ विचारून संस्कृत चांगलं घटलेलं. एकदा भेंड्या खेळताना स्वतःच त्यांनी चार ओळींची कविता रचली :

*'घाली उडी संकटी या लवेंद्रा । जेवी दिली भेट तुवा गजेंद्रा ।*
*धावोनी रक्षी नत बालिकेला । मी वंदिते रे चरणांबुजाला ॥'*

इतकी कविता त्यांना आजही आठवते. त्यांनी शालेय वयात 'पत्रादाई' नावाचं एक नाटुकलं लिहिलं होतं. कन्याशाळेत पुण्याला शिकत असताना त्यांना बाळूताई खरे (मालतीबाई बेडेकर) हेडमिस्ट्रेस होत्या. त्यांनी पद्माताईंना लेखनाला उत्तेजन दिलं. त्यांचं नाटुकलं शाळेत गॅदरिंगलाही केलं होतं. घरातल्या वातावरणाने आणि शाळेतल्या व पुढे एस.एन.डी.टी. कॉलेजात वामन मल्हार जोशींच्या प्रेरणेने पद्माताईंच्या लेखनाचा आणि वैचारिक जडणघडणीचा पाया पक्का होत होता. पद्माताईंचं बालपण ज्या वाड्यात गेलं तो वाडा हिंडून पाहत असताना हे सारं त्यांच्या साहित्यिक कर्तृत्वाचं आरेखन डोळ्यांसमोर येत



अनुक्रमणिका

होतं. पुढे पतींनीही त्यांना लेखनाला उत्तेजन दिलं. त्यांनी विवाह केला तोही इच्छित वराशी. प्रेमविवाह. त्या वेळी त्या होत्या मॅट्रिकला. लग्न झाल्यावर शिकणं हे सासूबाईंना पसंत नव्हतं. पण त्यांची मर्जी संपादन करून त्या काळातील महिला विद्यापीठाची जी.ए. पदवी घेतली, आणि मराठीत त्या सर्वप्रथम आल्या. १९३१ साली त्यांची पहिली कविता यशवंत मासिकात प्रसिद्ध झाली आणि मग कवितासखीनं त्यांच्याशी मैत्री केली ती आजतागायत. 'बाराद्वारी' पाहत असताना पद्माताईंचा हा जीवनपट डोळ्यासमोर आला. आणि मग त्यांनीच वर्णन केलेल्या आरसे महालात प्रवेश केला. दुसऱ्या मजल्यावरील आरसेमहाल प्रेक्षणीय. इथे पाच फूट उंचीचे आरसे. इथे सिद्धीबाईसाहेब पटवर्धनांचं भव्य सुंदर तैलचित्र. हे पद्माताईंच्या भगिनी कमलाबाईंनी काढलेलं. या मातोश्री. इथे हंड्या-झुंबरं. पेशवेकालीन वैभवाची साक्ष देणारे सुरूचे खांब. एक खोली सुतारपट्टी. एक धाकटा दिवाणखाना. एक पहाऱ्याची खोली. एक देवाची. एक खोली चित्रांची. या खोलीत खोलीभर चारी भिंतींवर संपूर्ण रामायणातील चित्रं काचेवर काढलेली आहेत. अत्यंत दुर्मिळ अशी ही चित्रं पाहताना वाटलं, ही नीट जतन व्हायला हवीत. त्या काळातील चित्रांचा हा एक उत्तम नमुना आहे. अशी एकत्रित चित्रं आता क्वचित पाहायला मिळतात. एका खोलीत खोलीभर फोटो टांगलेले आहेत. त्यांत पराक्रमी परशुरामभाऊंपासून आतापर्यंतच्या पिढीचे फोटो आहेत. त्यांत एक फोटो पंचमजॉर्ज आणि राणीचाही लक्ष वेधून घेतो. ज्या खोलीत आम्ही जेवण घेतलं, त्या दालनात उत्तम अशी भित्तिचित्रं आहेत. त्यांतील रंग वनस्पतिजन्य आहेत. ती टिकविण्याच्या दृष्टीने राजेंद्र पटवर्धन प्रयत्नशील आहेत. आता ही चित्रं दुर्मिळ होत चालली आहेत. हे सारं पाहत असताना, ऐकत असताना निघण्याची वेळ होत आली होती. अजून मंदिर पाहायचं होतं. निघताना सिताराताईंचा निरोप घेतला. तीन-चार तासांत पटवर्धन पती-पत्नींनी अगत्याने सारा वाडा दाखवला होता. निघताना तटभिंत पाहिली. पाच बुरुजांतील एक बुरूज कलावंतिणीचा. गणपतिउत्सवात वाड्यावर कीर्तन व्हायचं आणि कलावंतांचा कार्यक्रमही. कलावंतिणीला आणायलाही पालखी जाई. पाच दिवस उत्सव चाले. राजेंद्र पटवर्धनांनी कितीतरी माहिती दिली. एक नांदत्या वैभवाचं चित्रच डोळ्यापुढे उभं केलं. खंडोगणती धान्याच्या राशी वाड्याच्या चौकात येत. अशी २-३ हजार एकर मालकीची जमीन असणारं हे घराणं. खाजगी देवालय. भिलवडीची शेती-वाडा किती वैभव. अशा वैभवशाली खानदानी कुळात जन्मलेल्या पद्माताई मात्र अगदी साध्या, मितभाषी. कधी गर्व नाही. खरं खानदानीपण त्यांच्या अंगी मुरलेलं. आता हे सारं पाहत असताना, ऐकत असताना पद्माताईंच्या कवितेतले कितीतरी अंतर्गत धागे उलगडत गेले.

*अवघ्या भारताची सेवा*
*बाणा अमुचा मराठी*
*प्राण तळहातावरी*
*देशासाठी धर्मासाठी.*








असं कवितेतून सांगणारी वाणी आणि 'निरोप' कवितेतील

| | |
|---|---|
| *बाळ चाललास रणा* | *घरा बांधिते तोरण* |
| *पंचप्राणांच्या ज्योतींनी* | *तुज करिते औक्षण* |

असं म्हणणारी आई

| | |
|---|---|
| *याच विक्रमी बाहूंनी* | *स्वतंत्रता राखायाची* |
| *खांद्यावरी या विसावे* | *शांती उद्याच्या जगाची* |
| *म्हणूनिया माझ्या डोळा* | *नाही थेंबही दुःखाचा* |
| *मीही महाराष्ट्रकन्या* | *धर्म जाणते वीराचा* |
| *नाही एकही हुंदका* | *मुखावाटे काढणार.* |

असं म्हणत पुढे म्हणते :

*"मीच लावून ठेवली तुझ्या तलवारीला धार."*

पराक्रमी अशा सरदार घराण्यातील या कवयित्रीच्या धारदार लेखणीतून अशा तेजःपुंज कविता न उतरतील तर नवल. कारण अंगात रक्त सळसळतंय एका पराक्रमी वीर घराण्याचं.

त्या पराक्रमी पुरुषाच्या वास्तूला नमस्कार करून मी निरोप घेतला, आणि आम्ही परशुरामभाऊंचं गणपतीचं मंदिर पाहायला निघालो. श्री गणपती पंचायतनांचं दगडी देवालय. त्यासमोरील गोपुर व त्या गोपुराची सातमजली इमारत प्रेक्षणीय आहे. समोर आहे नगारखाना. भाऊंचा वाडा आणि गोपुराचं टोक एकाच बिंदूत. हे ९७ फूट उंच. गणपतीच्या देवळापासून जवळच नारळाची बाग. गणपती चतुर्भुज आहे. उजव्या सोंडेचा गणपती क्वचित. पुढे नंदी. गणपतीपुढे ओतीव तांब्याचे हत्ती. मंदिराचा दरवाजाही उत्तराभिमुख. गणपतीच्या उजवीकडे शंकर. देवाला जडिताचे दागिने. नवरत्नांचे हार. पुढे सभामंडप. चार खांबांवर. वर हंड्याझुंबरं टांगलेली, गोपुर प्रेक्षणीय. दोन दीपमाळा. पंधरा दिवसांतून छबिना निघतो. चतुर्दशीच्या दिवशी वाद्य वाजंत्री. गणपती हे उपास्य दैवत. वाजंत्री वाजवणारा मुसलमान. मुसलमानच देवाचे कपडे शिवतो हे विशेष. भाद्रपदात पाच दिवस छबिना निघतो. अबीर, गुलाल उधळला जातो. गोपुर पद्धतीनं बांधलेलं हे भव्य मंदिर अत्यंत सुंदर आहे. ह्या कुलदैवताची उत्तम देखभाल राजेंद्र पटवर्धनांच्याकडून होते आहे. कुलदैवता देवी जगदंबा. तासगावजवळून वेरळा (येरळा) नदी वाहते. ही आठवणही पद्माताईंनी सांगितली होती.

वैभवशाली अशा या तासगाव संस्थानाचा निरोप घेण्याची वेळ आली. कारण नंतर पुण्याला जायला एकच गाडी होती. वेळात वेळ काढून राजेंद्र पटवर्धनांनी गाव, वाडा, मंदिर सारं दाखवलं. पेशवेकालीन वाडा, त्याचं वैभव, तिथली दुर्मिळ भित्तिचित्रं, रामायणातील काचेची चित्रं पाहून डोळ्यांचं पारणं फिटलं. पद्माताईंची बाळपावलं जिथं दुडूदुडू फिरली, त्या वाड्याचा कोपरा न् कोपरा डोळ्यांनी टिपला आणि निघता निघता त्यांच्या तासगावचा परिसर पाहत पाहत तासगाव-पुण्याच्या गाडीत बसलेही. मनात साठवल्या होत्या त्या

ऐतिहासिक आठवणी. शेजारी बसलेले गृहस्थ द्राक्षतज्ज्ञ असावेत. ते यंदाच्या वर्षीच्या द्राक्ष- निर्यातीची माहिती सांगत होते. यंदाचं विक्रमी उत्पादन, परदेशात इथल्या मिळालेल्या द्राक्षांची बाजारपेठ, निर्यातीची पद्धत, या क्षेत्रात उतरलेल्या कंपन्या, पॅकिंगची पद्धत वगैरे द्राक्षंनिर्यातीच्या या वाढत्या मागणीमुळे शीतगृहांची उभारणी मोठ्या प्रमाणात होऊ लागलीय. येथील दत्त माळावर अशोक बाफना यांनी शीतगृह उभारलंय. तासगाव आता जगाच्या नकाशात द्राक्षांसाठी ओळखलं जातं. मी हे सारं ऐकत होते. पण माझ्या डोळ्यांसमोर होत्या पद्मताईंच्या कविता. रस्ताभर आता निसर्ग दिसणार नव्हता, कारण आता अंधारून आलं होतं. धूसर संधिप्रकाशात तासगाव मला अद्भुत नगरीसारखं भासत होतं. या नगरीतली राजकन्या पद्मराजे. बालपणी पितृछत्राला पारखी झालेली. मग पुण्यात शिक्षणासाठी कसब्यातील तासगावकर पटवर्धनांच्या वाड्यात वास्तव्य. तिथून कन्याशाळेत शिक्षण आणि मग कविता करण्याचा लागलेला नाद. तो आजतागायत. या कवयित्रींनी सहा दशकांत संपन्न अशी कविता मराठी सारस्वताला दिली. समाजवादाचा पुरस्कार करणारी. नव्या विचारांनी भारलेल्या स्त्रीचं चित्र आपल्या कवितेतून रेखाटलं.

*'नाही मी नुसती मादी मी माणूस माणूस आधी'*

नव्या युगातल्या स्त्रीचा विकासक्षम आलेख कवितेतून रेखाटला.

*"अर्धी मानवता मी मजला पाहीन दास्यी ठेवीन कोण ?"*

असा दुर्दम्य आत्मविश्वास असणारे उद्गार कवितेतून ठामपणे व्यक्त केले.

*सगळी दारं उघडी टाकून*
*मोकळा श्वास घेऊ दे*
*श्वास दिला त्याचा ध्यास*
*घेत घेत जाऊ दे'*

स्त्रीला स्वतःविषयी झालेली अशी जाणीवही कवितेतून व्यक्त केली.

'आम्हापुढे दाही दिशा लक्ष्मणरेषा' म्हणत अजूनही संकुचितपणे जगणाऱ्या स्त्रीच्या अस्मितेचा हा चढता आलेखही त्यांनी स्तुत्यपणे कवितेतून रेखाटला.

आणि

*म्हणोत तुला स्वप्नवेडी*
*खुळ्या स्वप्नात रंगणारी*

असं सांगत

*घडले ते तर होते किंचित*
*श्रावणातले फूल जुईचे*
*स्वतः भिजोनी नीज गंधाने*
*स्वरूप दे मज ओलेतीचे"*











असा काव्यात्म सुगंध अवघ्या काव्यभर पेरीत

*मी एक पक्षीण आकाशवेडी*
*दुजाचे मला भान नाही मुळी*
*डोळ्यांत माझ्या असे एक आकाश*
*श्वासात आकाश प्राण तळी*

असं आकाशाचं स्वप्न बांधणारी ही कवयित्री.

*आकाशयात्रीस ना खेद त्याचा*
*निळी जाहली जी सबाह्यांतरी*

असं अलौकिकत्व काव्यात व्यक्त करणारी.

पुण्याची वाट येईपर्यंत पद्माताईंच्या 'प्रीतिपथावर' पासून 'श्रावणमेघ' पर्यंतचा काव्यप्रवास डोळ्यांसमोर होता. पार्श्वभूमीवर होता पटवर्धनांचा तासगावचा भुईकोट राजवाडा. आणि कृष्णाकाठच्या सुपीक जमिनीत ज्या कवितांना धुमारे फुटले त्या पद्माताईंच्या कवितेची पार्श्वभूमी.

(२४, ऋणानुबंध, डी.पी. रस्ता, औंध, पुणे ४११ ००७)

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
### नवे आजीव सदस्य (एप्रिल-जून १९९३)
### (अन्य ठिकाणचे)

प्रा. सावे नयन (मु. बाणगाव, जि. ठाणे), प्रा. डॉ. बिवलकर रामचंद्र महादेव (डोंबिवली), देव बाळकृष्ण शामसुंदर (डोंबिवली), अभ्यंकर सतीश दामोदर (डोंबिवली), देऊलकर नंदकिशोर दिनकर (डोंबिवली), वैद्य पुरुषोत्तम भालचंद्र (डोंबिवली), ओक पुरुषोत्तम सदाशिव (डोंबिवली), घारपुरे गजानन त्र्यंबक (डोंबिवली), श्रीमती उपासनी लता पांडुरंग (कल्याण), बुवा विनायक आदिनाथ (कल्याण), गोरे रवींद्र मधुकर (कल्याण), दिवाडकर रघुनाथ वसंत (अंबरनाथ), दिवाडकर उदयकुमार सखाराम (कल्याण), ओक जनार्दन श्रीकृष्ण (कल्याण), केळकर श्रीधर गोविंद (कल्याण), माने अशोक पिराजी (कल्याण), सौ. ओक जयश्री शरदचंद्र (कल्याण), प्रा. सौ. नांदुर्डीकर मंगला शरदचंद्र (कल्याण), सौ. मराठे मनीषा भास्कर (कल्याण), घोडवैद्य वसंत भास्कर (कल्याण), प्रा. मोरे अरविंद विठ्ठल (धुळे), प्रा. पोतदार कृष्णा काशिनाथ (धुळे), प्रा. अत्रे श्यामकांत हनुमंत (डोंबिवली), केतकर सुरेशचंद्र कृ. (डोंबिवली), सौ. मयेकर कविता कृष्णकांत (डोंबिवली), सौ. जगदाळे कुसुम रघुनाथ (बारामती), जाधव अशोक भीमराव (बारामती), प्रा. कु. ढवळीकर शामला पंडित (बारामती), भोसले प्रदीप महादेव (बारामती), माळवणकर वसंत दत्तात्रय (बारामती), सुभेदार संदीप कमलाकांत (बारामती), वाघ नितीन अरविंद (बारामती), कुलकर्णी अवधूत सखाराम (बारामती), पाटील उल्हास तु. (नांदेड).

---



अनुक्रमणिका



डॉ. वसंत स. जोशी

# संशोधक वि. अं. कानोले : एका लेखाच्या निमित्ताने

नांदेडचे कै. विश्वेश्वर अंबादास तथा तात्यासाहेब कानोले हे मराठीतील एक ख्यातनाम संशोधक होते. हळुवार, विनम्र वृत्तीच्या आणि साध्या राहणीच्या तात्यासाहेबांनी आपल्या जिद्दीने, चिकाटीने आणि परिश्रमाने संशोधन क्षेत्रात स्वतःचे एक स्थान निर्माण केले होते. त्यांच्यातील संशोधन वृत्तीला प्रोत्साहन करण्यात म. म. दत्तो वामन पोतदार यांचे महत्त्वाचे स्थान होते. मराठवाड्यात सर्वत्र विखुरलेली ऐतिहासिक आणि वाङ्मयीन संशोधनाची सामग्री जमविण्याची आणि त्यातून संशोधनपर लेखन करण्याची प्रेरणा म. म. पोतदारांकडून कै. तात्यासाहेबांना मिळाली होती.

दत्तो वामन पोतदार हे तात्यासाहेबांचे संशोधन क्षेत्रातील गुरू होते. आपला शिष्य म्हणून पोतदारांनाही त्यांचे कौतुक होते. आपल्या या गुरूविषयी तात्यासाहेबांना केवळ आदरभावच नव्हे, तर भक्तिभाव होता. म. म. पोतदारांच्या प्रतिमेची ते रोज पूजा करीत आणि त्यांचा जन्मदिनही साजरा करीत. शक्य तेव्हा आपल्या या शिष्याकडे जाण्यात पोतदारांना आनंद वाटत असे. शेवटच्या काही दिवसांतही तात्यासाहेबांच्या आग्रहामुळे ते नांदेडास जाऊन आले.

म. म. पोतदारांनी महाराष्ट्रात विविध संस्थांची उभारणी केली आणि त्यांच्या संगोपनार्थ आपले जीवित वेचले. 'मंडळीकरणा'वर त्यांचा भर असे. कै. तात्यासाहेब कानोले यांनी नांदेड येथे स्थापन केलेल्या 'गोदातीर इतिहास संशोधन मंडळ' या संस्थेची प्रेरणाही पोतदारांकडूनच मिळालेली होती. कै. तात्यासाहेबांनी संशोधन सामग्री केवळ एकत्रित करून तिचा संग्रह बनविला असे नाही, तर तिचा उपयोग करून आपल्या तर्कबुद्धीच्या साहाय्याने मौलिक संशोधनपर लेखनही केले. मुकुंदराज आणि वामनपंडित यांच्याविषयी त्यांनी केलेले संशोधन महत्त्वाचे ठरले आहे. शिवाय शक्य तेव्हा वेळोवेळी त्यांनी स्फुट लेखनही केले आहे. त्यामुळे मराठवाड्यातील संशोधकांत कै. तात्यासाहेबांना मानाचे, आदराचे स्थान प्राप्त झाले. संशोधन पूर्ण होईतो आपणास उपलब्ध झालेल्या साधनांची कल्पना इतरांना द्यावयाची नाही, ते गुप्त ठेवावयाचे, हा या पिढीतील संशोधकांचा खाक्या होता. कै. नरहर कुरुंदकर यांनी कै. तात्यासाहेब कानोले यांच्याविषयी 'मनोहर' मासिकात एक लेख लिहिला होता. त्यात त्यांनी तात्यासाहेबांविषयी गमतीने म्हटले होते, "तात्यासाहेब रस्त्यात भेटले आणि त्यांना विचारले की, 'तात्या कुठे निघालात ?' ते पूर्वेकडे जात असले तरी म्हणावयाचे, 'जरा पश्चिमेकडे जाऊन येतो." रामदासांचा 'गुप्त ते गुप्त जाणावे' हा बाणा तात्यासाहेबांच्या या वागण्यातून

लक्षात येतो.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या संशोधन समितीचा प्रमुख म्हणून काम करीत असताना 'भाषा व साहित्य : संशोधन' हा ग्रंथ मी संपादित केला. त्यात अनेक विषयांवरील अधिकारी व्यक्तींचे लेख समाविष्ट करण्यात आले आहेत. या ग्रंथात काही अनुभवी, जाणकार विद्वानांचे 'संशोधनातील अनुभव' द्यावेत या कल्पनेने मी कै. शंकरराव देव, कै. डॉ. वा. वि. मिराशी, कै. म. म. पोतदार, कै. प्रा. ग. ह. खरे, डॉ. शं. गो. तुळपुळे यांचे लेख मिळविले. 'भाषा व साहित्य : संशोधन' या ग्रंथाच्या तिसऱ्या खंडात ते प्रसिद्ध करण्यात आले आहेत.

कै. तात्यासाहेब कानोले यांना त्यांनी मराठवाड्यात सर्वत्र हिंडून मिळविलेले साहित्य आणि त्याद्वारे केलेले लेखन या अनुभवांवर आधारित एक लेख पाठवावा, असे पत्र मी दि. २२ डिसेंबर १९७६ रोजी पाठविले. त्यांच्या अनुभवांचे मोल मोठे होते आणि म. म. पोतदारांनीही त्यांचा लेख मिळविण्याची सूचना मला केली होती. त्यामुळे मी वारंवार स्मरणपत्रे पाठवून लेखाची मागणी करीत होतो आणि तात्यासाहेबांकडून त्यांची उत्तरेही येत होती. मध्यंतरी ते वाईस आले. त्या वेळी माझ्याकडे येऊन पाहुणचार घेऊन गेले. पुणे येथे १९७७ मध्ये भरलेल्या मराठी साहित्य संमेलनातही त्यांची भेट व बोलणे झाले.

नकळत एक आपुलकीचा, जिव्हाळ्याचा भावबंध आम्हा उभयतांत निर्माण झाला.

'संशोधनातील अनुभवांवर आधारित लेख लिहून पाठविण्याविषयीचा आमचा पत्रव्यवहार सुमारे दीड वर्ष चालला होता. कै. तात्यासाहेबांचे मला आलेले शेवटचे पत्र दि. २० एप्रिल १९७८ चे आहे; त्यात आपण लेख पूर्ण करून देऊ शकलो नाही याची खंत त्यांनी व्यक्त केली आहे. या संदर्भात त्यांची मला आलेली पत्रे पुढे देत आहे. कै. तात्यासाहेबांचे व्यक्तिमत्त्व, त्यांची कार्यपद्धती, म. म. पोतदारांविषयीचा त्यांचा भक्तिभाव या साऱ्यांचे दर्शन त्यातून घडू शकेल.'

– १ –

श्री.

Godater Itihas Samshodhan Mdndal,
NANDED. (Maharashtra)
गोदातीर इतिहास संशोधन मंडळ, नांदेड.
२४ जानेवारी १९७७.

डॉ. वसंत स. जोशी
वाई (जि. सातारा)
सप्रेम न. वि. वि.

आपले दि. २२–१२–७६ चे पत्र पावले. संशोधन पद्धतीवरील ग्रंथासाठी 'संशोधनातील माझे अनुभव' हा लेख लिहिण्यास नुक्ताच हाती घेतला आहे. आपण लेख १५ जानेवारीपर्यंत पाठविल्यास चालेल, असे पत्री कळविले होते. पण एक तर पुढील











फेब्रुवारी-मार्च हे संस्थेच्या वर्षाखेरचे म्हणून विशेष कामाचे आहेत. व याच अवधीत दोन-तीन महत्त्वाचे लेख संपवूनच पाठवावयाचे आहेत. ही गोष्ट लक्षात घेऊन आपण एक-दोन महिन्यांची सवलत दिल्यास मी मार्चपर्यंत लेख पाठविण्याचे अवश्य करीन. शिवाय हा विषय आवडता व बऱ्याच अनुभवाचा असल्यामुळे अशा महत्त्वाच्या ग्रंथाकरता लेख लिहावा, अशी माझी उत्कट इच्छा आहे. लेखाच्या पूर्ततेकडे व तो लवकर पाठवावा याकडे माझे सर्वतोपरी लक्ष आहे. तरी वेळेचा व कामाच्या निकडीचा विचार करून वर दिलेल्या मुदतीचा विचार व्हावा.

पत्रोत्तर यावे.

कळावे, लोभ असावा, ही विनंती.

आ. नम्र
वि. अं. कानोले
संचालक, गोदातीर इतिहास संशोधन मंडळ, नांदेड.

– २ –

नांदेड २०.४.७७

सप्रेम न. वि. वि.

आपले दि.६.४.७७ चे ताजे कार्ड पावले. 'संशोधनातील माझे अनुभव' हा लेख अग्रक्रम देऊन लिहिण्यास हाती घेतला आहे. मला सतत स्मरण असून कबूल केल्याप्रमाणे लेख पाठविण्याच्या जबाबदारीची व मुदतीची तीव्र जाणीव आहे. अलीकडे वृद्धापकाळामुळे पूर्वीसारखा कामाचा उरक राहिला नाही. वरकड कामेच मधून मधून उपस्थित होतात. तेव्हा आता इतर सर्व कामे बाजूला ठेवून लेख शक्य तितक्या लवकर पूर्ण करून पाठविण्याचे करतो. त्याकरता लेखाची फाईल व टिपणे समोर ठेवली आहेत. आपण मागील एका पत्रात गुरुवर्य महामहोपाध्याय पोतदार यांच्या वाई येथील भेटीचा व संभाषणाचा उल्लेख केला होता, तो मोठा हृद्य व मनाला आनंद देणारा वाटला. त्यांच्या- आमच्या भेटीचा योग २-३ वर्षे होत आली लांबतच गेला. असे का व्हावे याचे पोटी दुःख वाटते. त्यांच्या वयामुळे व शरीरप्रकृती थकल्यामुळे मनात चिंता घर करून आहे. मे महिन्यात कदाचित तिकडे काही कामानिमित्त आलो तर पुण्यास किंवा वाईस भेटल्याशिवाय राहणार नाही. भेटून पत्री क्षेमसमाचार कळवावा.

तुम्ही एका महत्त्वाच्या ग्रंथात लेख लिहिण्याचा मान व निमंत्रण मला दिले, याबद्दल मनःपूर्वक आभारी आहे. ते तुम्ही जमेल तसे मजकडून पूर्ण करून घ्यावे व सांभाळून न्यावे, एवढीच अपेक्षा.

आपला
वि. अं. कानोले
गोदातीर इ. सं. मंडळ, नांदेड.









– ३ –

॥ श्री ॥

नांदेड, १४ मे १९७७

सप्रेम नविवि.

आपले दि. २३.४.७७ चे कार्ड पावले. लेख पूर्ण होऊन लवकर आपणास मिळावा व वरातीमागून घोडे असे होऊ नये, याविषयी प्रयत्नशील व जागरूक आहे. म्हणून थोडे थोडे रोज लिहीत आहे. आपल्या पत्रावरून गुरुवर्य महामहोपाध्याय पोतदार सध्या पुण्यास असल्याचे कळाल्यावरून पुण्याच्या पत्त्यावर लगेच पत्र पाठविले होते, ते त्यांना पोहचले असल्याचा निरोप आला आहे. पुण्यास मी आलो तर वाईस आल्याशिवाय राहणार नाही. पूर्वी मी एकदा महाबळेश्वराहून पुरातत्त्व मंडळाची बैठक संपवून गुरुवर्यांबरोबर पुण्यास परत जात असताना वाईस काही तास मुक्काम केला होता. तेव्हा 'आनंदीधाम'चे बांधकाम चालू होते. मोटरमधून गावात येताना कृष्णेचा काठ, देऊळे, प्राज्ञपाठशाला दुरून पाहिली तेवढी लक्षात आहेत. आपण अगत्य व ममत्त्वबुद्धीने पत्र लिहून लेखन कृतीत आणावयास लावले, याबद्दल मनःपूर्वक आभारी आहे.

कळावा, लोभ असावा, ही विनंती

आपला
वि. अं. कानोले.

– ४ –

जा.क्र. ४०/७७-७८
नांदेड, १३.८.७७

सप्रेम नविवि.

आपले दि. २७.७.७७ चे पत्र मिळाले. लेख लिहून स्थूल स्वरूपात पूर्ण झाल्यासारखा आहे. परंतु मजकूर नीटनेटका करून कोठे संक्षेप आणि कोठे काही महत्त्वाची माहिती व नवे मुद्दे सुचले ते प्रविष्ट करून मुद्रणप्रत तयार करण्याचे काम बाकी राहिले आहे. आपण १० ऑगस्टपर्यंत लेख पाठवावा म्हणून कळविले ते तर शक्य झालेच नाही. पण आणखी एखादा महिना लागेल यात शंकाच नाही. ऑगस्ट महिन्यात नाही ती कामे संस्थेची अंगावर येऊन पडतात व निस्तरण्यास हा महिना पुरत नाही. पुण्यास ऑक्टोबर महिन्यात महाराष्ट्र साहित्य संमेलन आहे. तेव्हा आम्ही प्रा. कुरुंदकर वगैरे बरीच मंडळी पुण्यास येणार आहोत. गुरुवर्य महामहोपाध्याय पोतदार यांनी या सुमारास पुण्यास बोलविले आहे व आमच्या आग्रहास्तव ते नांदेडला महिना- पंधरा दिवस राहणार आहेत. व येथपर्यंत त्यांना आणण्याची व्यवस्थाही केली जाणार आहे. या प्रसंगी आपलीही पुण्यास भेट होईल व लेख












आपले स्वाधीन करता येईल, असा विचार होता. पण आपल्या पत्रावरून लेख जितक्या लवकर पाठविता येईल तितक्या लवकर पाहिजे आहे. म्हणून सप्टेंबरपर्यंत पाठविण्याचे करतो. हा लेख लिहून घेण्याचे सर्व श्रेय तुम्हालाच आहे व आपला परिचय संबंध व जिव्हाळा वाढविणारा हा एक योगायोगाने दुवा आहे. विलंब झाला आहे. पण त्यातल्या त्यात मनास एवढेच समाधान आहे की, तो पूर्ण होण्याच्या मार्गावर आहे. आपण सांभाळून घ्यावे, एवढेच. दुसरी गोष्ट : ऑगस्ट महिन्यात मुंबईस पुरातत्त्व मंडळाची बैठक असल्याचे पत्र सचिव पुरातत्त्व मंडळाकडून आले आहे. तारीख मात्र अद्याप लिहून आली नाही. तारीख याच महिन्यात निश्चित झाल्याचे कळाले तर मुंबईस जाईन व परत येताना पुणे, औरंगाबाद असा परत येईन. लिहिण्याचा उद्देश असा की पुण्यास आलो म्हणजे गुरुवर्य ती. दादा पुण्यास किंवा वाईस असले तर तेथे येऊन भेटल्याशिवाय राहणार नाही. मग आपलीही भेट होऊ शकेल. गुरुवर्यांना भेटून निरोप कळवावा. चरणनमनाची मनात सारखी ओढ आहे. पत्रोत्तर यावे. इकडील सर्व कुशल कळवावे.

कळावे, लोभ असावा ही विनंती.

आ. नम्र.
वि. अं. कानोले

— ५ —

जा क्र.५१/७७-७८
नांदेड
१९ सप्टेंबर १९७७.

सप्रेम न वि वि.

दि. १३ सप्टेंबरला श्रावणी सोमवार आपणाकडे सोडून आपला व आपल्या सहधर्मिणीचा व दुसऱ्या दिवशी सकाळी गुरुवर्यांचा प्रेमळ निरोप घेऊन ८ ॥ च्या सुमारास वाई वस स्टँडवरून बसने पुण्यास १२ वाजता आलो व थोडा उपाहार करून दुपारी दोनच्या बसने रात्री ८ च्या सुमारास औरंगाबादेस ज्येष्ठ चिरंजीवांच्या घरी पोहचलो. औरंगाबादेस २-३ दिवस मुक्काम करून गणेश चतुर्थीच्या दुसऱ्या दिवशी नांदेडास आलो. औरंगाबादेस मराठवाडा विद्यापीठात डॉ. यू. म. पठाण यांच्याशी झालेल्या भेटीत आपणाकडे पाठवावयाच्या लेखाचे स्मरण करून दिले. तरी पण आपण पुन्हा एकदा स्मरणपत्र पाठवावे असे वाटते.

वाईच्या मुक्कामात मला सर्वत्र आपले घर असल्याचाच अनुभव आला. बऱ्याच दिवसांच्यानंतर झालेल्या गुरुवर्यांच्या भेटीने मन आनंदित झाले व सुखासी महासुख भेटले, अशी माझी मनःस्थिती झाली. आपणा उभय दांपत्याचा सौजन्यपूर्ण स्वभाव, आतिथ्यभाव व मुला-मुलींची वागणूक पाहून मनास संतोष वाटला. आपल्यामुळेच वाईचे सांस्कृतिक



अनुक्रमणिका







दर्शन घडून तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा पूर्वपरिचय व विश्वकोश मंडळाचा संबंध अधिक वाढला. सर्वांना माझे प्रणाम.

(१) वाईत समक्ष बोललो त्याप्रमाणे या महिनाअखेर लेख पाठविण्याचे करतो. स्मरणपत्राची मर्यादा मी ओलांडून चुकलो. लेख पाठविला म्हणजे मिळवली.

(२) विश्वकोश मंडळाकडे नांदेडवर लेख पाठविण्याचे काम ३० तारखेपर्यंत पूर्ण करून पाठवितो. वाईहून विश्वकोश मंडळाचे पत्रही आले आहे. त्यांना निराळे पत्र पाठवीत आहे. नांदेडवरील विश्वकोश मंडळाकडे आलेला मजकूर जर scrutiny करून पाठवावयाचा असेल तो मजकडे जरूर पाठवावा. याविषयी श्री. जाधव यांना सांगावे.

(३) विश्वकोश मंडळाचे खंड साहित्य व सांस्कृतिक संस्थांना शासनातर्फे व साहित्य सांस्कृतिक मंडळातर्फे मिळण्याची सवलतव्यवस्था होत असल्यावद्दलचे पत्र मुंबईहून महाराष्ट्र राज्य साहित्य व सांस्कृतिक मंडळाकडून आले आहे. वाईस विश्वकोश मंडळात तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या भेटीत याविषयी बोलणे झाले होते. आपले लक्ष असावे. व खुद्द म.रा.राज्य साहित्य व संस्कृती मंडळाने आमच्या संस्थेस विश्वकोशाचे खंड भेट देण्याविषयी सुचवावे.

(४) महाराष्ट्र साहित्य पत्रिकेत २-३ वर्षांपूर्वी प्रसिद्धीकरता मी. प्रा. कुरुंदकरांवरोबर जो लेख संपादकाकडे (श्री. भालचंद्र फडके) पाठविला होता त्या लेखाचे नाव 'आद्य श्री शंकराचार्यांच्या अपरोक्षानुभूतिवरील एक अप्रसिद्ध प्राकृत टीका' (नाथकृत ?) श्री. भालचंद्र फडके यांची व नंतरच्या संपादकांची लौकरच लेख छापतो, अशी पत्रे येऊनही दोन वर्षे होऊन गेली तरी छापला नाही. हा लेख कार्यालयात आहे किंवा नाही, काय झाला, याविषयी शोध घेऊन लेख लवकर छापण्यास सांगावे किंवा परत घेऊन 'नवभारता'त छापला तरी हरकत नाही. [३]

हेच पत्री श्री. खोडवे [४] यांना स.न. कळविणे. गुरुवर्यांना निराळे पत्र पाठवीत आहे. पत्रोत्तर यावे. लोभाची वृद्धी असावी. घरी सर्वांना माझे शुभाशीर्वाद.

आपला<br>
वि. अं. कानोले

– ६ –

५७/७७-७८<br>
नांदेड<br>
२४-१०-१९७७

सप्रेम न. वि. वि.

वाई येथील गेल्या महिन्याच्या भेटीनंतर आपणाकडून एखादे परामर्शरूप पत्रही आले नाही, याचे आश्चर्य वाटले. आपल्या प्रत्यक्ष भेटीनंतर आपणाविषयी ममत्व व आपलेपणा










विशेष वाटू लागला आहे, यात संशय नाही. अर्थात हा माझा स्वभावधर्म आहे. विश्वकोशाच्या मुख्य संपादकांस व माननीय तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांना कबूल केल्याप्रमाणे नांदेडविषयक सर्व मजकूर नव्याने लिहून दिला व टंकप्रतीतील scrutinyचाही मजकूर तपासून पाठविला. तो कितपत त्यांच्या उपयोगी आला हे समजले नाही. या खटाटोपात ८/१५ दिवस सहज निघून गेले. मला आपणाकडे पाठवावयाच्या लेखास मात्र पुन्हा एकवार उशीर झाला. वरातीमागून घोडे असे होऊ नये, म्हणून तो आता संक्षेपाने लिहिण्यात सारखा मग्न आहे. ४/५ नोव्हेंबरपर्यंत नक्कीच आपणाकडे येईल याबद्दल खात्री वाटत आहे. उशिराच्या कल्पनेने माझी झोपही उडाली आहे. वाईच्या मुक्कामात मी आपल्याकडील टंकप्रत केलेले जे एक-दोन लेख वाचले त्यावरून मला माझ्यापुरती खात्री वाटत आहे की, माझाही लेख चांगला व माहितीपूर्ण होईल.

गुरुवर्य महामहोपाध्याय पोतदार यांच्याकडील कुशलवृत्त व प्रकृतिमान आपणाशिवाय कोण कळविणार? त्यांची नाजूक प्रकृती लक्षात घेता पत्रोत्तराचे श्रम त्यांना देणे इष्ट नव्हे, म्हणून आपणास सुचवून ठेवीत आहे. नोव्हेंबरला दीपवाळीनंतर पुण्यास महाराष्ट्र साहित्य संमेलन भरणार आहे. त्याप्रसंगी आपली भेट होईलच. साहित्य पत्रिकेत मी पाठविलेल्या लेखाचे काय झाले, हे पाहण्याविषयी आपणास सुचविले होते, त्याचे काय झाले. असे कित्येक लेख कोठे कोठे प्रसिद्धीकरता पाठविले होते त्यांचा पत्ता लागला नाही. असो.

दसरा-दिपवाळी आपणा सर्वांना सुखकर व आनंदाची जावो. पत्रोत्तर यावे.

कळावे, लोभ असावा, ही विनंती

आ. नम्र
वि. अं. कानोले.

– ७ –

जा. नं. ७५/७७-७८
नांदेड
८-१२-७७

सप्रेम न. वि. वि.

पुण्यास साहित्य संमेलनात घाईघाईत आपली भेट झाली, याचा मनास फार आनंद झाला. आपली मुले-मुली कुटुंबही संमेलनास आले होते, पण भेटणे शक्य झाले नाही. गुरुवर्य महामहोपाध्याय पोतदार यांचा संमेलनमंडपाजवळच प्रिंसिपल गोगटे यांच्या बंगल्यात मुक्काम असल्यामुळे जवळच्या जवळ चार-दोन वेळा भेट व बोलणे झाले. नांदेडला येण्याविषयीचा गुरुवर्यांचा विचार थोडाबहुत पूर्वनियोजित असल्यासारखा असल्यामुळे त्यांना भेटणे व विचारपूस करून घेणे अवश्य होते, म्हणूनही पुण्यास येणे



अनुक्रमणिका






अवश्य होते. आता पुढील महिन्यात जानेवारीत तो योग जुळून येईल असे वाटते. गुरुवर्य पोतदार आता पुण्याहून वाईस बहुधा आले असावेत. त्यांना भेटून त्यांचे प्रकृतिमान व इकडील कुशलवृत्त कळवावे.

मुख्य लिहिणे बाजूलाच राहिले. आता सर्व कामांतून निवांत झालो व लेख उत्तम मनःस्थितीत निवांतपणे लिहावयास व मुद्रणप्रत तयार करावयास बसलो आहे. १५/२० तारखेच्या आतच लेख पूर्ण करून रजिस्टरीने आपणाकडे पाठवीत आहे. किती आश्वासने दिली व मोडली गेली या विचाराने मनाची कातरता व वाटणारी खंत लिहवत नाही. पण अखेरीस हे संभाळून घ्यावे व एवढे पत्र खरे मानावे ही विनंती. कळावे, लोभ असावा.

आपला

वि. अं. कानोले

ता.क. म. साहित्य पत्रिकेकरता मी पूर्वी पाठविलेल्या लेखाचे स्मरण असू द्यावे.

– ८ –

जा. ६/७८-७९

नांदेड

२०-४-७८

प्रिय डॉ. वसंत स. जोशी

वाई (सातारा)

स. न. वि. वि.

पत्रव्यवहार काही लेखांपुरताच किंवा प्रासंगिक कारणाकरता होतो असे मला वाटत नाही. ममत्व व आपलेपणा अंतःकरणातून दुरावत नाही. लेखाबाबत आपण वेळ सवलत पुष्कळच देऊन पाहिली. पण बुद्धी कुंठित व्हावी, असा वेळ झाला. त्याचा बोल मी स्वतःलाच लावून घेतो. शिळ्या कढीस पुन्हा ताजे करण्यासारखे आहे. पूर्ववयात भराभर लिहीत गेलो. पण आता एकाग्र होऊन काम हातावेगळे होत नाही. Encyclopedia of Sikhism मध्ये लेख पाठविण्याची गत अशीच झाली. दोन पराभव तूर्त तरी डोळ्यांपुढे आहेत. पण हे दोन्ही लेख मी आत्मसमाधानार्थ पूर्ण करणार. वाया जाणार नाहीत. पूर्ण झाले व योग आला तर ते छापावे अशी घटनाही घडून येईल. पूर्वी मी नांदेड येथील 'सत्यभामा' मासिकाच्या दिवाळी अंकात 'संशोधनातील माझे अनुभव व कार्य' या विषयावर मुलाखत दिली होती. ती या संदर्भात आपल्या सहज अवलोकनात यावी म्हणून पाठवीत आहे.[५] उपयोग झाल्यास पाहावा.

माननीय तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी मागे नांदेडला येऊन गेले. त्यांच्या निमंत्रणावरून प्राचार्य नरहर कुरुंदकर दि. २३/२४ च्या सुमारास वाईस येत आहेत. तेव्हा त्यांच्या भेटीचा, सहवासाचा व संभाषणाचा लाभ सर्वांना होईलच. गुरुवर्य म. म.

पोतदारांनाही भेटतील व तेथील सर्व हकीकत त्यांच्याकडून आम्हास कळेल.

एक अपेक्षा आपणाकडून नेहमी असते की, गुरुवर्यांची प्रकृती व स्वास्थ्य कसे आहे ते आपणाकडून समजून यावे. प्रकृती अस्वास्थ्यामुळे पत्र लिहिण्याचे श्रम अलीकडे होत नाहीत व इकडे बरोबर माहिती समजत नाही. तरी मधून मधून वस्तुस्थिती कळवीत असावे. आजच वेगळे पत्र मी त्यांना लिहिले आहे.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेतील माझ्या लेखाची आपण चौकशी करावी. महत्त्वाचा लेख आहे. लेख पाठवून ३ वर्षे झाली. वाटल्यास 'नवभारता'त द्यावा.

हेच पत्री माननीय तर्कतीर्थांना माझा सादर नमस्कार कळवावा व विश्वकोश मंडळातील परिचितांनाही कळवावे. पत्रोत्तर सवडीने यावे.[६] घरी सर्वांना आशीर्वाद व शुभेच्छा. कळावे, लोभ असावा, ही विनंती.

आपला
वि. अं. कानोले

**टीपा**

१) सुरुवातीच्या पत्रातील पत्ता व संचालकपदाचा उल्लेख तसाच ठेवला आहे. पुढील पत्रांतून तेवढा भाग वगळून मूळ मजकूर दिला आहे.

२) पोतदारांचे वाईतील निवासस्थान.

३) हा लेख शोध घेऊनही उपलब्ध झाला नाही.

४) सांप्रत औरंगाबादेच्या 'कथाश्री' मासिकाचे संपादक.

५) हा अंकही मिळाला नाही.

६) या पत्रानंतर तात्यासाहेबांचे पत्र आले नाही आणि लेखही मिळाला नाही.

(१७३० ई, सहावी गल्ली, राजारामपुरी, कोल्हापूर — ४१६ ००८)

---

**साभार स्वीकार**

१. **हरिगौरव**– भा.न. मोकाशी; सौ. वर्षा भालचंद्र मोकाशी; पृष्ठे १२४, मूल्य ४०/- रु.

२. **अशा वाटा, अशा कथा**– अ.रा. दामले, अपर्णा प्रकाशन, पृष्ठे ८१.

३. **सावल्यांचा खेळ**– शिवराम खोचीकर, दीपगौरी प्रकाशन, पृष्ठे १७२, मूल्य ६५/- रु.

४. **सुस्मिता**– शिवराम खोचीकर, राहुल प्रकाशन, पृष्ठे १३८, मूल्य ५५/- रु.

५. **अष्टपैलू**– विद्याधर गोखले, मानसन्मान प्रकाशन, पृष्ठे १६४, मूल्य ८०/- रु.

६. **मराठी लघुकथेचा इतिहास**– प्रा. म.ना. अदवंत, नीहारा प्रकाशन, पृष्ठे १७२, मूल्य ९०/- रु.

७. **कालपात्र**– बाळकृष्ण बन्नोरे, संघमित्रा प्रकाशन, पृष्ठे ५२, मूल्य ९०/- रु.



अनुक्रमणिका

अरविंद वामन कुलकर्णी

# सतरावे वर्ष : पौगंडावस्थेतील एक अर्थपूर्ण प्रेरणाव्यूह

'सतरावे वर्ष' ही पु. भा. भावे या मराठीतील समर्थ कथालेखकाची एक गाजलेली कथा. या कथेचे केंद्र बबन नावाचा एक मुलगा आहे. हा बबन एका सुखवस्तू मध्यमवर्गीय कुटुंबातील असून त्याने नुकतीच वयाची सोळा वर्षे पुरी केली आहेत. तो मॅट्रिकच्या वर्गात शिकतो आहे. हुशार, सद्वर्तनी आहे. अभ्यास व वर्तन या दोन्ही क्षेत्रांत त्याला वर्गात पहिला क्रमांक मिळालेला आहे. शिवाय त्याला वाचनाची आवड आहे. तो पापभीरू आहे. तेव्हा एकंदरीने त्याच्या बाबतीतील बाह्य तपशील पाहता 'आदर्श विद्यार्थी' ठरावा असाच बबन आहे. म्हणजे त्याचे एकूण अवसान पाहता तो 'नीतिबोधात्मक कथेचा नायक' ठरावा.

पण हा बबन कसल्यातरी अनामिक अस्वस्थतेच्या हुरहुरीच्या जाळ्यात अभावितपणे गुरफटत जातो. त्याच्या हातून पुस्तकाच्या मलपृष्ठावर एका स्त्रीचे उत्तान चित्र काढले जाते. शेजारी राहणाऱ्या कुणा सावित्रीवहिनी नावाच्या तरुण विवाहित, सुस्वरूप स्त्रीबद्दल त्याच्या मनात आकर्षण वाढीला लागते. तिच्या कुरूप, बेढब व वयस्कर नवऱ्याचा- दादा रानड्यांचा– त्याला तिरस्कार वाटू लागतो. त्याच्या वर्गातील उनाड भय्या टोणगेच्या अचकट विचकट बोलण्याबद्दल नवी चोरटी आस्था वाटू लागते. वहिनी आणि सुमन यांच्याबद्दल अनुचित वाटेल असे काहीतरी बोलणाऱ्या टोणगेशी तो (शारीरिक ताकद नसतानाही) मारामारी करतो. त्याच्या या नव्या हिमतीचे तालीम मास्तरांनाही आश्चर्य वाटते. पुढे दादा रानड्यांची तारेने बदली झाल्यामुळे वहिनींनाही परगावी जावे लागते. त्यामुळे तो अतिशय अस्वस्थ होतो. पोरका झाल्यागत दुःखी होतो. खूप रडतो. नुसते रडावे असेच त्याला वाटू लागते. त्यातच त्याला झोप लागते आणि स्वप्नात मैत्रीण सुमन वहिनींची जागा घेत असल्याचे त्याला दिसते. त्याच्या चेहऱ्यावर त्यामुळे स्मित उमटते व ते चेहराभर पसरत जाते.

या साऱ्या तपशिलाच्या आधारे बबनला नायक करून लेखकाने एक चांगल्यापैकी कथात्म व्यूह उभा केला आहे. तपशिलाच्या रचनेमागे एक चांगले व्यवस्थासूत्र कार्यरत झालेले असल्याने हा व्यूह आस्वादकाच्या मनावर एकसंध संस्कारही करण्यात यशस्वी ठरलेला आहे. बबनविषयीची संकल्पिलेली वस्तुस्थिती आणि तिचे घटना-प्रसंगगत विकसन यातील कार्यकारण किंवा आधाराधेय संबंध चांगला राखला गेला आहे. तेव्हा



अनुक्रमणिका

जिला ज्ञात् अशी जाणिवेची कक्षा म्हणता येईल त्या कक्षेतील कृतीउक्तींचे कथात्म संघटन यशस्वी झालेले आहे. पण बबनबाबतची मूळ संकल्पिलेली अनामिक अस्वस्थता, हुरहूर, बऱ्यावाईटाचा विचार इत्यादींचे स्वरूप लक्षात येण्यासाठी, त्यांच्या अ-सामान्य, तर्कात न बसणाऱ्या वेगळेपणाची नेमकी संगती लावण्यासाठी ही जाणिवेची ज्ञात कक्षा व तीमधील व्यवहार उपयोगास येत नाहीत. त्यासाठी (फ्राईडने सांगितलेल्या मनाच्या तिसऱ्या व्यापक स्तराचा म्हणजे) नेणिवेचा शोध घ्यावा लागतो. बबनला (नव्याने) जे जे वाटते आणि त्यांच्याकरवी (नव्याने) जे जे होते त्या सर्वांची संगती लावण्यासाठी आणि त्याआधारे कथेचे मर्म वा रहस्य लक्षात घेण्यासाठी बबनच्या नुसत्या वरवरच्या मानसिकतेचा नव्हे, तर खोल नेणिवेचा शोध आवश्यक ठरतो.

फ्राईडच्या मतानुसार तर्कात न बसणाऱ्या आणि त्यामुळे आकलनाच्या दृष्टीने निसरड्या भासणाऱ्या माणसाच्या कृतिउक्तींमागे त्याच्या नेणिवेतील मूलप्रेरणा, सहजप्रवृत्ती, काही गंड कार्यकारी घटक म्हणून उभे असतात. या उक्तीकृती नेहमीच नेणीवनियंत्रित असतात. म्हणून त्यांच्याबाबतीत न सुटणारे प्रश्न निर्माण होतात. जाणिवेने नियंत्रित अशा कृतिउक्तींबाबत असे प्रश्न निर्माण होत नाहीत. कारण तिथे तर्कशक्तिजन्य कार्यकारणादी संबंधाचा स्वच्छ प्रकाश असतो. पण नेणीव ही एक अंधारी गुहा असून स्मरणशक्तीला ताण देऊन थोड्याफार प्रयत्नांनी जाणिवेच्या पातळीवर खेचल्या जाणाऱ्या अर्ध- जाणिवेच्या पातळीच्याही खालची ती पातळी असते.

'सतरावे वर्ष' मधील बबनच्या मानसिकतेचा विचार करताना त्याच्या बाबतीतील एक वस्तुस्थिती महत्त्वाचे मार्गदर्शन करू शकते. बबन हा पौगंडावस्थेत असून त्याचे मन हे पौंगडावस्थेतील मन आहे. मानसशास्त्रदृष्ट्या ही अवस्था हा मुलाच्या विकसनातील एक अतिशय महत्त्वाचा टप्पा आहे.

Allen Frances यांनी या संदर्भातील फ्राईडचे मत पुढीलप्रमाणे दिलेले आहे : 'Freud believed that children grow through a series of five overlapping stages of what he called psycho- sexual development.'

These stages are–

1) **The Oral phase :** Infants find pelasure in sucking.

2) **Annal phase :** Children enjoy controlling the discharge of body-wastes. (age upto 4)

3) **The Fallic phase :** They become increasingly aware of their sex-organs. They also develop an Oedipus complex. (Or Electra Complex).

4) **The latency phase :** While in elementary school, children

move into the less emotional latency period.

**5) The adolscence phase :** This stage involves a struggle between childish feelings of dependency and adult longings for independence.

ही पाचवी अवस्था म्हणजे पौगंडावस्था. परावलंबनाच्या बालसुलभ जाणिवा आणि स्वावलंबनाची प्रौढ असोशी यांचे द्वंद्व या अवस्थेत मुलाच्या मनात चालू असते.

या अवस्थेबद्दल मानसशास्त्रात आणखीही काही स्पष्टीकरणे दिलेली दिसतात. बाल्यावस्थेचा हा अखेरचा टप्पा असल्याने तो महत्त्वाचा ठरतो. असे म्हटले जाते की, हा टप्पा 'sense of personal indentity' चा आहे. स्वत्वाची जाण करून देणारी ही अवस्था आहे.

'Adolscents feel a strong need to compare favourably with others their age. Anything that makes them different will likely upset them.' . . . 'They learn to become more independent and to make their own decisions. And they discover new ways of developing relationships with the other sex.' (John J. Burt.)

आपल्या वयोगटात मोडणाऱ्यांशी स्पर्धेची जाणीव, इतरांहून आपल्या ठिकाणी वेगळेपणा दिसल्यास खेद वाटणे, स्वतःच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची होऊ लागलेली जाणीव, स्वतंत्र निर्णयशक्तीची ओढ, भिन्न लिंगियांशी संबंध/संपर्क साधण्यासाठी नवनव्या क्लृप्त्यांचा शोध लावणे अशी काही निरीक्षणे या संदर्भात टिपली गेलेली दिसतात.

प्रस्तुत कथेतील बबनच्या कृतिउक्तींमागे ही सूत्रे स्पष्टपणे दिसून येतात. एका बाजूला त्याचा वहिनींशी जुळत चाललेला प्रेरणा-संवाद आणि दुसऱ्या बाजूला भय्या टोणगेबाबत त्याचा गडद होत चाललेला विरोध दर्शविणाऱ्या त्याच्या साऱ्या कृतिउक्तींमागे त्याची पौगंडावस्थेतील विशिष्ट नेणीव आहे. त्याची अनाकलनीय अस्वस्थता, हुरहुर, वहिनींच्या गालगुच्चे घेण्यासारख्या कृती प्रथम नकोशा आणि नंतर हव्याशा वाटणे, वहिनीसुद्धा प्रथम (विजातीय अप्राप्य) परीप्रमाणे आणि नंतर (सजातीय प्राप्य) राजकन्येप्रमाणे वाटू लागणे. वहिनी व सुमनसाठी टोणगेशी मारामारी करणे, ताईमाई या सख्ख्या बहिणींचा लळा कमी होणे अशा स्वरूपाचा त्याच्याबाबतीत सांगितला जाणारा जो इतर तपशील आहे त्यामागे त्याची पौगंडावस्थेतील नेणीवच आहे.

इथे हे लक्षात घेतले पाहिजे की, लिंग-योनी-संबंधाची जाणीव आणि अपेक्षा ही पौगंडावस्थेनंतरच्या (तारुण्य या) अवस्थेतील जाण आहे. म्हणूनच याबद्दलचे सूचन प्रस्तुत कथेतील बबनच्या कोणत्याही कृतिउक्तीद्वारा मिळत नाही. मात्र स्त्री-पुरुष संबंध (किंवा लिंग-योनी-संबंध) त्याच्या वाढत्या कुतुहलाचा, आकर्षणाचा विषय बनत चालल्याच्या सूचना मात्र मिळत जातात. सुमनशी बोलत असताना त्याने सहजपणे कागदावर 'वर्तुळ'

काढणे किंवा टोणगेवर हल्ला करताना 'अणकुचीदार डिव्हायडर' वापरणे या कामेंद्रियांच्या दृष्टीने अर्थपूर्ण ठरणाऱ्याच सूचना आहेत. वहिनींच्या शरीराचा स्पर्श हवासा वाटणे ही जाणीव आणि त्यांना खडे मारण्याची त्याने शोधलेली क्लृप्ती त्याच्या नेणिवेत नव्याने होऊ लागलेल्या हालचालींचीच निदर्शक आहे. आणि यात भर टाकण्याचे कार्य Prisoner of Zenda सारखी रोमँटिक वळणाची कादंबरी, Gold Diggers of NewYork सारखा प्रणयरम्य चित्रपट आणि घरात आलेल्या पाहुण्या नवविवाहित तरुण जोडप्याच्या खोलीतील कामक्रीडासूचक अस्ताव्यस्तपणा यासारखा कथेतील तपशील करतो.

वहिनींविषयी त्याला वाटू लागलेल्या आकर्षणामागे आणखी एक मानसशास्त्रीय सूत्र सूक्ष्मपणे कार्यकारी झालेले दिसते. ते 'मातृकाम्ये'चे म्हणजे Oedipus Complexचे होय. आई आणि बालक यांच्यात एक सुप्त लैंगिक आकर्षण नेणिवेच्या पातळीवर वास करीत असते, असे हे फ्राईडचे सूत्र सांगते. त्यामुळेच आईबद्दलच्या ओढीतील प्रतिस्पर्धी म्हणून प्रथम वडिलांबद्दल मत्सरयुक्त राग आणि नंतर आईचे प्रेम जिंकणारा म्हणून आदर अशा जाणिवा मुलाच्या ठिकाणी संभवतात आणि याखातरच मुलगा वडिलांचे अनुकरण नैसर्गिकरीत्या करू लागतो असेही सांगण्यात येते. बबनच्या बाबतीत असे दिसते की वाढीला लागलेल्या Super ego मुळे सारासारविचार वा विवेकाच्या जाणिवेमुळे त्याचे आईविषयीचे आकर्षण आपोआप दडपले गेलेले आहे आणि त्याचा मोहरा वहिनीकडे वळलेला आहे. वहिनीकडेच का वळतो हे दाखविणाऱ्या जागा कथेतच आहेत. बबनला वहिनींबद्दल ताईमाईहून काही जास्त वेगळे व चांगले वाटायला लागते याचा उल्लेख झाल्यानंतर कथेत या दृष्टीने काही अर्थपूर्ण मजकूर भेटतो. 'वहिनींचे आणि बबनच्या आईचे खूप रहस्य होते.' 'अगदी लहानपणी त्याला बहिणींबद्दल वाटणारा लळा कुठे गेला होता कोण जाणे ? पण आज तो बहिणींचे जेव्हा मुळीच ऐकत नसे, तेव्हा वहिनींचे अगदी सहज ऐके. आणि ह्या गोष्टीमुळे त्याच्या आईला वहिनींविषयी अधिकच आपुलकी वाटत असे.' शेवटी बबन आणि वहिनी झोपाळ्यावर बसून झोके घेतात असा प्रसंग आहे, तेव्हाही एक असाच उल्लेख आहे. त्या वेळी 'बबनची आई सोधन्याला ओले हात पुसत चारदोनदा तेथे येऊन गेली. तिनेसुद्धा 'बबन, दिवसेंदिवस लहान होतो आहेस का रे तू ?' ही ठरीव वंदना त्याला दिली नाही. हे सर्व उल्लेख एकत्र केले की बबनची आई आणि वहिनी ह्या त्याच्या नेणिवेच्या लेखी कशा समकक्ष झालेल्या होत्या, आणि त्याचे आईबद्दलचे आकर्षण कसे वहिनीबाबत संक्रान्त होते हे ध्यानात येऊ शकते. आणि या मातृकाम्येच्या सूत्रामुळे बबनच्या वहिनींविषयीच्या आकर्षणाला एक वेगळेच मूळ लाभते. यातून अपरिहार्यपणे संभवतो तो दादा रानड्यांबद्दलचा तिरस्कार किंवा प्रतिकूल भाव. पौगंडावस्थेत रोवले गेलेले असल्यामुळे वहिनींबद्दलच्या आकर्षणाची प्रतिक्रिया दादा रानडे या त्यांच्या नवऱ्याच्या बाबतीत प्रतिकूलच राहते. तिचे आदरभावात रूपांतर होत नाही. (नाना या

बबनच्या वडिलांच्या बाबतीत मात्र असे होत नाही. तिथे super ego च्या प्रभावामुळे प्रतिकूलतेने धाकाचे, आदराचे 'उदात्त' रूप घेतलेले दिसते. उगाच नाही बबनचे वहिनींबरोबरचे झोपाळ्यावरील सुखद आंदोलणे या 'नानांच्या गर्जने'नेच संपुष्टात येते !)

'Freud thaught that people do not say or do anything accidentally. Unconscious mental activity causes such 'accidents' as slips of tongue or forgetting an appointment. According to Freud, the mind experiences more unconscious than conscious activity.' म्हणजे फ्राईडच्या मते चुकून किंवा अनवधानाने कसलीही उक्ती वा कृती माणसाकरवी घडत नसते. जाणिवेच्या ज्ञात स्तराच्या दृष्टीने असे 'चुकणे' वा 'अनवधान' म्हणणे शक्य असते. पण नेणिवेच्या अज्ञात स्तराच्या दृष्टीने ते तसे नसते. अशा कृतीउक्ती नेहमीच नेणीवप्रेरित योजनाबद्ध असतात. प्रस्तुत कथेतील बबनने चुकून तो प्रणयरम्य इंग्रजी चित्रपट पाहणे, पुस्तकाच्या मलपृष्ठावर सहजगत्या 'अश्लील' चित्र काढणे, वहिनींना गंमत म्हणून मारलेले खडे नको तिथे लागणे, काढले गेलेले ते अश्लील चित्र पुसायला रबर न सापडणे, त्याऐवजी चॉकलेट व पाकवलेले बदाम सापडणे या सर्व गोष्टींमागे बबनच्या नेणिवेचे व्यवस्थापन उभे आहे. कारण त्याच्या पौगंडावस्थेतील मानसिक व्यापाराच्या दृष्टीने या सर्व गोष्टी कमालीच्या अर्थपूर्ण ठरणाऱ्या आहेत.

या वयात वाढीला लागलेल्या 'अत्यहं' च्या (super egoच्या) प्रभावामुळे मनातील जाणिवेच्या पातळीवरील निर्बंधक (censor) पहारेकरी जास्तच कार्यदक्ष होतात. चांगल्यावाईटाच्या, योग्यायोग्याच्या कल्पना मनाचा कबजा घेऊ लागतात. कारण म्हणून यामागे वडीलधाऱ्यांच्या कृतिउक्ती, सामाजिक संकेत, लोकव्यवहार इत्यादीही सूत्रं असू शकतात. बबनच्या बाबतीत त्याचे वडील नाना, त्याची व सुमनची आई, शाळेतील शिक्षक, वर्गात त्याला परीक्षेतील हुशारी व एकूण सद्वर्तन यासाठी मिळालेली पहिल्या क्रमांकाची पारितोषिके, स्वामी ब्रह्मचर्यानंदांचे 'ब्रह्मचर्य हेच जीवन, अब्रह्मचर्य हा सर्वनाश' असे संदेश इत्यादी गोष्टी म्हणजे असे निर्बंधक पहारेकरीच होत. ही सारी बबनच्या पौंगडावस्थेतील मनात वाढू लागलेल्या 'अत्यहं'चीच चेष्टिते ! पण हे पहारे चुकवून बबनची नेणीव तृप्तीला भिडण्यासाठी वेगवेगळे मार्ग शोधून काढतेच काढते.

मानसशास्त्रदृष्ट्या 'Puberty period'मध्ये म्हणजे 'a period of dramatic sexual development'- मराठीत ज्याला आपण 'वयात येण्याचा काळ' म्हणतो त्या काळामध्ये मुलगा आणि मुलगी यांच्या मना-शरीरात इतरांना (आणि त्यांनाही) जाणवतील असे काही बदल घडून येत असतात. बबन आणि त्याच्या शेजारी राहणारी सुमन यांच्या बोलण्यातून त्यांच्या ठिकाणी होत असलेले शारीरिक बदल स्पष्टपणे उल्लेखिले गेले आहेत. घोगरा, फुटल्यागत व्हायला लागलेला आवाज किंवा भरू लागलेले शरीर इ.

तपशील तिथे भेटतात. अशा तपशिलापेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या दोघांनाही होत चाललेली अशा बदलांची जाणीव होय. त्या विशिष्ट वयामुळे वा पौगंडावस्थेमुळेच असे बदल उघडपणे बोलून दाखविण्याचा एक नैसर्गिक मोकळेपणा दोघांच्याही ठिकाणी असलेला दिसतो. त्यांचे Prisoner of Zenda च्या नायक, नायिका व खलनायक यांच्याबद्दलचे आत्मसूचक बोलणे वेगळ्याच तऱ्हेने अर्थपूर्ण आहे. त्या दोघांच्याही नेणिवेत परस्परांबद्दल चाललेल्या ज्या नव्या, अननुभूत हालचाली आहेत त्यांच्या दृष्टीने हे बोलणे सूचक व मार्गदर्शक ठरते. आपल्याला त्रास देणाऱ्या टोणग्याशी आपल्यासाठी बबनने मारामारी करावी असे सुमनला आतून वाटणे आणि वहिनी- सुमनसाठी त्या टोणग्याला खासा धडा शिकविला पाहिजेच असे बबनला वाटणे, हे या अवस्थेतील मानसिकतेचेच दर्शन घडविणारे उदाहरण आहे.

आपल्यापेक्षा वय वगैरेंनी मोठ्या असणाऱ्याबद्दलची अनुकरणीय ओढ असणाऱ्या या अवस्थेमुळेच 'सुमन बबनची बायको' या शब्दांचे स्मरण असूनही बबनला 'पूर्णावस्थेच्या अगदी जवळ गेलेल्या गुलाबासारख्या' वहिनींबद्दल जे काही वाटे ते 'घट्ट आणि अस्फुट गुलाबकळीसारख्या' सुमनबद्दल वाटत नव्हते. बबनच्या नवोदित कामप्रेरणेला चाळविणारे हे दोन घटक. सुमन हा या प्रेरणेला स्पर्शिणारा, तर वहिनी हा या प्रेरणेला कबजात घेणारा घटक. मात्र बबनच्या संदर्भात हे दोन्ही घटक संवादी. म्हणून बबनचे मन संघर्षभूमी होत नाही. इतकेच नव्हे, तर अगदी अलगदपणे सुमन बाजूला सरणाऱ्या वहिनींची जागा घेते. सुमनशी बोलताना 'तू सुद्धा वहिनीसारखी दिसायला लागलीस थोडी' असे बबन म्हणतो. सुमनबाबतच्या त्याच्या या वाटण्याची अखेर स्वाभाविकपणेच शेवटी स्वप्नात 'सुमनची आकृती हळूहळू अगदी वहिनींसारखी भरीव व डौलदार बनत चालली होती' या प्रतीतीत होते.

बबनच पुस्तकात रमणारा आहे. 'तू नुसती पुस्तकेच वाचत बैस.' असे त्याला एकदा टोणगे म्हणतोही. पुस्तकाचे जग हे स्वप्नाचे जग. बबनच्या मनोविश्वात त्याचे स्थान मोठे आहे. निर्बंधकाचे पहारे चुकवून दृश्यमान होण्यासाठी त्याच्या नेणिवेला संधी वा सोय करून देणारी स्वप्न ही एक जागा आहे. सिनेमा पाहिल्यानंतर झोपेत पडलेल्या स्वप्नामध्ये त्या अर्धनग्न स्त्रियांतीलच वहिनी एक दिसणे किंवा अखेरीच्या स्वप्नात सुमनने वहिनींची जागा घेतल्याचे दिसणे त्याच्या नेणिवेच्या व्यवहाराच्या दृष्टीने अर्थपूर्ण ठरते.

टोणगे आणि वहिनी ही या कथेतील आणखी दोन वेगळी कामप्रेरणेची रूपे आहेत. पौगंडावस्था ओलांडून तारुण्यावस्थेत प्रवेश केलेला टोणगे आणि ही प्रेरणा गंडरूपाने स्थिरावणाऱ्या प्रौढावस्थेतील वहिनी. घरच्या आणि बाहेरच्या विशिष्ट परिस्थितीमुळे टोणगेच्या बाबतीत अत्यहंला फारसा थारा नाही. त्यामुळे त्याच्या मनात निर्बंधकाची उपस्थिती नाही. शिवाय त्याचा अहम् (ego) अगदी आत्मविश्वासात परिणत झालेला. त्यामुळे त्याची ही प्रेरणा सतत जाणिवेच्या पातळीवर येऊ शकते आणि कृतिउक्तींद्वारा

गोचरही होऊ शकते. त्याच्या प्रस्तुत कथेतील अस्तित्वालाच या प्रेरणेचा अर्थ प्राप्त झालेला आहे. वहिनींच्या ठिकाणी मात्र या प्रेरणेची अतृप्ती दिसते. त्यांच्या नेणिवेचा मोहरा बबनकडे वळलेला आहे, हे त्यांच्या कृतिउक्तींतून स्पष्टपणे दिसते. पण त्यांच्या मनातील निर्बंधकाचा पहारा, अत्यहंमुळे जागता आहे. बबनबाबत त्यांच्या नेणिवेत मातृकाम्येचे एक सूत्र आहेच. पण असेही म्हणता येईल की बबनच्या आईशी जुळवून घेणे, तिच्या विश्वासास पात्र होणे किंवा तिच्याशी समकक्ष होत जाणे ही वहिनींच्या नेणिवेचीच किंवा त्यातील अतृप्त कामेच्छेचीच करामत आहे. वियोगाच्या वेळी बबनबरोबर झोके घेताना त्यांची ही कामेच्छाच शेवटचे सहवासाचे सुखक्षण समरसून स्वीकारताना वा भोगताना दिसते.

पु. भा. भावे यांनी बबनच्या या कथेचे लेखन जाणिवेच्या पातळीवरून केलेले असले आणि वाचकांकडून तिचा आस्वादही जाणिवेच्या पातळीवरूनच घेतला जात असला, तरी या कथाविश्वाचे संपूर्ण नियंत्रण बबनच्या पौगंडावस्थेतील नेणिवेकडून केले जात असल्याचे दिसते. तिथे उभा होत असलेला व्यूह आणि तो गोचर करणारा तपशील म्हणजे त्याच्या नेणिवेची चेष्टिते वाटावीत अशी एक स्वप्नसदृशता, एक गूढरम्य वातावरण, घटितांबाबत जाणवणारा एक आत्माभिमुख सुखद रोख असे काही विशेष या कथेत दिसून येतात. (म्हणूनच टोणगे हरणारा खलनायक होतो, तर वहिनी-बबनच्या 'छुप्या' प्रेमव्यवहाराची कल्पना आलेली काशी मोलकरीण नुसती फिदीफिदी हसते. कसल्याही विरोधी हालचाली करीत नाही. नाना-आई वगैरेंनाही त्या दोघांच्या वागण्यात काही गैर दिसत नाही. त्यांचा संशय येणे वगैरे होत नाही !) एकंदरीने कथेला एखाद्या दिवास्वप्नांचे रूप लाभत ज.ते.

'स्वतःला काय होत आहे, ते बबनला नीटसं कळेना. त्याला झोपावंसंही वाटेना आणि वाचावंसंही वाटेना.' या ओळीने प्रस्तुत कथेचा प्रारंभ होतो. बबनच्या या चमत्कारिक वाटणाऱ्या अकारण अस्वस्थतेचे उगमस्थान त्याची नेणीव आहे हे थोड्या विचारांती लक्षात येते. आणि इथून कथाभर नेणिवेचा कारभार चालू होतो. मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांना वाचनासाठी नेमलेल्या Prisoner of Zenda या कादंबरीतील फार महत्त्वाची म्हणून शिक्षकांच्या सांगण्यावरून बबनने लाल शाईने अधोरेखित केलेली My dear Rose, for a man of spirit opportunities are duties ही ओळ पुन्हा त्याच्या नेणिवेच्या दृष्टीने मार्गदर्शक असल्याचे जाणवते. 'प्रिय रोझ, सत्त्वशील माणसाबाबत उपलब्ध संधी म्हणजे त्याची कर्तव्येच !' ज्याचे कामसत्त्व जागे होऊ लागले आहे असा बबन. आणि या दृष्टीने मिळणाऱ्या संधीकडे त्याने आवश्यक कर्तव्य म्हणूनच पाहिले पाहिजे असे याद्वारा होणारे मार्गदर्शन होय. पुढे दिसतेही असेच की, वहिनींबाबत मिळणारी प्रत्येक संधी बबन अगदी कर्तव्यभावनेने मनःपूर्वक स्वीकारतो.

यानंतर वर दिलेल्या वाक्यापाशीच त्याचे वाचन थांबणे, त्याची हुरहूर, चुकीने त्याने

Gold Diggers Of NewYork हा फाजील चित्रपट पाहिलेला असणे, अनवधानाने पुस्तकाच्या मलपृष्ठावर अश्लील चित्र काढले जाणे आणि याबरोबरच हे सर्व केल्याच्या शरमेच्या जाणिवेसह त्याच्या मनातील निर्बंधकाच्या उपस्थितीची कल्पना देणारा मजकूर पुढे येतो, त्याचा अत्यहं जागा होतो आणि त्याच्याकरवी ते चित्र काढलेले मलपृष्ठ टरकावले जाते. नागपूरच्या धनतोली भागाचे वर्णन हे खरोखर त्याच्या नेणिवेचेच दर्शन आहे. म्हणून या देखाव्याचा 'त्याच्या शारीरिक व मानसिक वृत्तींवर अवश्य परिणाम होतो.' निर्बंधकाच्या दबावाखाली त्याच्याकरवी त्याच्या नवोदित कामप्रेरणेचे (प्रत्यक्षात चित्र काढलेल्या मलपृष्ठाचे) तुकडे तुकडे करून भिरकावले जातात. तो अस्वस्थ असतो. 'त्या (निर्बंधकग्रस्त) अस्वस्थ अवस्थेतही बबन खिशातले पाकवलेले बदाम (प्रेरणातृप्तीचे एक साधन) विसरलेला नव्हता. दोन-चार बदाम एकदम तोंडात टाकून रवंथ करीत तो वहिनींच्या गच्चीजवळ डुलणाऱ्या कागदाच्या अखेरच्या भाग्यवान कपट्याकडे सॉक्रिटिसाच्या प्रश्नार्थक तंद्रीने पाहत असतानाच पायापासून डोळ्यापर्यंत गरम वाफेचे लोट उसळल्याचा अनुभव त्याला आला.' या उल्लेखातील तो कागदाचा कपटा 'भाग्यवान' आहे आणि बबनला लागलेली तंद्री सॉक्रिटिसाची (म्हणजे मूलभूत, तळ ढवळून काढणारी) आहे. परिणामी शरीर या प्रेरणेच्या ताब्यात येते आणि गरम वाफेचे लोट उसळल्याचा अनुभव येतो. वहिनींच्या माडीतील दिवे लागणे व बंद होणे यातील दृश्यानुभव हा जाणीव-नेणीव यांचीच क्रीडा आहे. इथे वहिनींच्या रूपाने त्याच्या या प्रेरणेच्या तृप्तीचा विषय मूर्त होतो. आणि वहिनी, भय्या टोणगे, सुमन असे या प्रेरणेशी संलग्न असणारे घटक स्वतंत्र कृतिउक्तींनिशी सविस्तरपणे साकार होत जातात. या साऱ्यांच्या द्वारा गोचर होत जातात ते बबनच्या पौगंडावस्थेतील नेणिवेचे व्यवहार किंवा हेलकावे; ज्यात प्रधान अशा नवोदित कामप्रेरणेशी संलग्न झालेल्या दिसतात इतर अनुरूप प्रेरणा आणि तज्जन्य कृतिउक्ती.

पौगंडावस्था ही जाणीव व नेणीव यांच्या दृष्टीने काही कालच टिकणारी एक संक्रमणावस्था असली, तरी नवप्रतीतीमयतेमुळे संघर्षाची व निकराची अवस्था असते. उत्कट उमाळ्याच्या रूपानेच ती कृतीउक्तिंद्वारा व्यक्त होते. त्याला अत्यहंची साथही एका मर्यादेपर्यंतच मिळते. नव्याने होऊ लागलेल्या सर्वच जाणिवांची पट्टी वरची लागत असते. बबनला वहिनी नुसत्या 'चांगल्या' नव्हे, तर अगदी 'पवित्र' वाटतात ते यामुळेच होय. या वयातील प्रतिक्रियाही तात्काळ आणि तीव्र असतात. वहिनींबद्दल त्याला अत्युत्कट ओढ वाटते आणि दादा रानड्यांबद्दल तसाच तिरस्कार वाटतो तोही यामुळेच असे म्हणता येईल. लवकरच संपणारी (म्हणजे दीर्घकाळ स्थिर नसणारी) ही पौगंडावस्था आणि त्यात निर्माण होणारे तशाच स्वरूपाचे विरोध- आकर्षण- रुसवे यांचीच एक रचना प्रस्तुत कथेत साधली गेलेली दिसते. शेवटी परगावी जाण्याच्या आधीचे बबन- वहिनींचे एकमेकांना खेटून अधांतरी झुल्यावर झुलणे या दृष्टीने अर्थपूर्ण होते. या वेळीही 'आणखी थोडा वेळ' अशी



अनुक्रमणिका

आर्त मागणी बबनच्या मुखाने त्याची नेणीवच करीत असते. आणि मिळणाऱ्या अधिक वेळामुळे सुखावत असते तीही त्याची नेणीवच.

वहिनींच्या माडीत विस्कटून पडलेले सामान पाहून बबनचे काळीज धडधडते, वहिनी कायमच्या परगावी जाणार हे कळल्यावर तो हातातला लाडू परत बशीत ठेवतो, तो गुदमरून जातो, हीसुद्धा सारी त्याच्या नेणिवेचीच चेष्टिते. तशीच वहिनी गेल्यानंतर त्याची होणारी असहाय, पोरकी, उजाड अवस्थाही, कधीच संपणार नाही किंवा संपू नये असे वाटणारे रडे आणि 'वहिनी वहिनी' अशा हुंदके दावत दिलेल्या हाका यांचे जन्मस्थान कामविषय दुरावल्याने विव्हल झालेली त्याची अतृप्त नेणीवच होय.

कथेच्या प्रारंभाप्रमाणे तिची अखेरही नेणिवेच्याच रोखाने असल्याचे दिसते. नेणिवेतून जन्माला आलेली बबनची ही कथा एका स्वप्नाच्या आधाराने परत त्या नेणिवेतच विलीन झालेली दिसते. फरक फक्त इतकाच की अस्थिर पौगंडावस्था ओलांडू पाहणाऱ्या आश्वासक वा सुखद अशा स्थिरतेच्या चाहुली तीत जाणवतात. कथेचा सूचक शेवट असा आहे. . . 'बबनला स्वप्न पडत होते. त्याच्या स्वप्नसृष्टीत आता सुमनने प्रवेश केला होता. आणि बाप रे ! सुमनची आकृती हळूहळू अगदी वहिनीसारखी भरीव आणि डौलदार बनत चालली होती. एखाद्या तडागावर वाऱ्याने लहर उमटावी तसे बबनच्या चेहऱ्यावर स्मित उमटले आणि पसरत गेले. त्या स्मितावर विजेच्या निळ्या दिव्याचा मंद आणि शांत प्रकाश पडला होता.'

प्रत्येक साहित्यकृतीच तिच्या मर्मग्रहणाची पद्धती सुचवीत असते असे म्हणतात. 'सतरावे वर्ष' या कथेची मागणी मानसशास्त्रीय समीक्षापद्धतीची आहे असे म्हणता येईल. कारण तर्काला सहजासहजी न सुटेल अशा व्यूहाची यात मांडणी झालेली आहे. कारण केवळ जाणिवेच्या स्तरावरून बबनच्या खास मनःस्थितीचे कोडे सुटणारे नाही. कारण त्याच्या कृतिउक्तींचे मूळ या स्तरात नाही. या पातळीवरील व्यवहार तसे सहजगम्य असतात आणि ते सर्वसाधारणपणे तर्क वा अनुमानाच्या आधारे किंवा कार्यकारण संबंधाचा शोध घेतल्यास उमजू शकतात. पण बबनला असे विपरीतसे काय झाले आहे, का होते आहे या प्रश्नाचे उत्तर 'त्याच्या वयामुळे' असे देता येईलही. पण ते फार मोघम होईल. त्याहून अधिक 'खोलात उतरून' त्याच्या मनाचा शोध घ्यावा लागेल. आणि खोलात उतरून म्हणजे त्याच्या 'नेणिवेचा शोध घेऊन' होय. त्या आधारेच त्याच्या कृतिउक्तींची प्रस्तुत कथेत जी संघटना उभारली जाते आहे, तिचा शोध घेता येईल.

'सतरावे वर्ष' या शीर्षकाच्या मार्गदर्शनतेवर जास्त भिस्त ठेवून एखादा समीक्षक असेही म्हणेल की पु. भा. भाव्यांनी पौगंडावस्था लक्षात घेऊन ही कथा बेतलेली आहे. म्हणजे त्यात कारागिरीचा भाग जास्त आहे. असे कथेचे 'बेतलेपण' इतर (कलावादी) समीक्षापद्धतींच्या जोरावर तो सिद्धही करू शकेल. पण मानसशास्त्रीय समीक्षेबाबतची अडचण अशी की, ती असे 'बेतलेपण' तिच्याजवळ असलेल्या मानदंडांच्या आधारे सिद्ध

करू शकत नाही. ती unveiling करून म्हणजे व्यक्तींवरील बुरखे बाजूला करून तिच्या नेणिवेचा धांडोळा घेईल आणि तेथील प्रेरणा, गंड आदींचे व्यवस्थापन तपासू शकेल. ही या पद्धतीची एक मर्यादाच म्हणता येईल का? की तिच्याकडून करू नये अशी ही अपेक्षा ठरेल?

(१४ स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता, पुणे ४११ ०३८)

---





अनुक्रमणिका

डॉ. रवींद्र ना. ठाकूर

# कादंबरी – एक वाङ्मयप्रकार : काही मुद्दे

मार्क्सवादी टीकाकारांच्या मते कादंबरी हे भांडवलशाही समाजरचनेचे अपत्य आहे. हे मत निर्विवादपणे स्वीकार्य नसले तरी मानवी समाज स्थिरावल्यानंतर त्याच्या सांस्कृतिक प्रगतीचा एक भाग म्हणून इतर कला आणि साहित्यप्रकारांबरोबर कादंबरीचा जन्म झाला असावा हे मात्र नाकारता येणार नाही. अर्वाचीन काळाचा विचार केल्यास कादंबरीचा उगम अठराव्या शतकात युरोपात झाला असे दिसते. डीफो, रिचर्डसन, फिल्डिंग हे युरोपातील आद्य कादंबरीकार ठरतात. आपल्या 'केतकरी कादंबरी' या ग्रंथात दुर्गा भागवत यांनी 'जपानमध्ये कादंबरी बाराव्या शतकात आणि चीनमध्ये पंधराव्या शतकात अस्तित्वात आली' हे डायना स्पिअरमनचे विधान उद्धृत करून पुढे म्हटले आहे की, "डायना स्पिअरमनला बाणाच्या कादंबरीची माहिती असती तर तिने या विधानात थोडा बदल केला असता."[१] बाणाची कादंबरी इ. सनाच्या सातव्या शतकात लिहिली गेली असल्याने कादंबरी सर्वप्रथम भारतात निर्माण झाली, असे दुर्गा भागवत यांना म्हणावयाचे असावे.

कादंबरीच्या मूळ स्वरूपाचा आणि उगमाचा प्रश्न आपणास देशोदेशीच्या प्राचीन कथन-परंपरांकडे घेऊन जातो. तथापि बाणाची कादंबरी वा जगात इतरत्र आढळणारी तत्सदृश साहित्यरूपे आणि अर्वाचीन कादंबरी यांची सांधेजोड सरधोपटपणे करता येईलच असे नाही. कादंबरीत समाविष्ट असलेल्या घटकांची बीजे प्राचीन काळातील देशोदेशीच्या कादंबरीसदृश लेखनात सापडत असली, तरी एक वाङ्मयप्रकार म्हणून कादंबरीने धारण केलेला रूपबंध ही बाब अर्वाचीन आहे. या संदर्भात मीनाक्षी मुखर्जी लिहितात, 'एकोणिसाव्या शतकातील युरोपमध्ये कादंबरी ह्या वाङ्मयप्रकाराने आपले स्पष्ट, स्वतंत्र व्यक्तिमत्त्व धारण केले, तेव्हा त्याचा घाट हा आधीपासून अस्तित्वात असणाऱ्या महाकाव्य, अद्भुतकथा व वीरकथा (Saga) या कथन प्रकारांच्या संरचनांपेक्षा निश्चितपणे भिन्न होता."[२] एकूणच अर्वाचीन कादंबरी युरोपात उगम पावली हे नाकारता येणार नाही.

अर्वाचीन भारतीय कादंबरीनेही याच कादंबरीचा वारसा स्वीकारला आहे. भारतात इंग्रजांचे राज्य दृढमूल झाल्यानंतर इंग्रजी विद्या व कलांचा जो प्रसार झाला त्याचे हे अपरिहार्य फलित होते.

अव्वल इंग्रजीतील महाराष्ट्रीय लेखकांनीही प्राचीन मराठीतील कथात्मक साहित्य परंपरेकडे दुर्लक्ष करून इंग्रजी साहित्य प्रकारांचे अनुकरण सुरू केले. मराठी कादंबरीला



अनुक्रमणिका

दिले गेलेले 'कादंबरी' हे सामान्यनाम संस्कृत परंपरा निर्देशिते. परंतु तो संबंध बराचसा नाममात्र म्हणावा लागेल. याचा अर्थ मराठी कादंबरीने संस्कृतचे ऋण स्वीकारलेले नाही, असा मात्र नाही. त्याविषयीचा उल्लेख पुढे येईलच.

एकीकडे वि. सी. सरवटे यांच्यासारखे मराठी साहित्य समालोचक, मराठी लेखकांसमोर केवळ संस्कृत वाङ्मयच नमुन्यादाखल असते, तर लघुकथा किंवा कादंबरीचा प्रकार कितपत विकास पावला असता हा प्रश्न आहे, अशी सांशकता व्यक्त करून मराठी कथा-कादंबरीच्या विकासाचे श्रेय इंग्रजी व फार्सी वाङ्मय भांडारास देतात,[३] तर त्याच वेळी दुसरीकडे राजकीय घडामोडींमुळे सामाजिक जीवनाची घडी इतकी विस्कटली नसती आणि मराठशाहीतील गद्यरचनेच्या प्रकारांची आठवण बुजली नसती व त्यांच्या अवशेषांची जास्त जपणूक झाली असती, तर या फार्सी किंवा इंग्रजी साहित्याशिवायही मराठी कादंबरीची उत्क्रांती झाल्याशिवाय राहिली नसती, असे निश्चितपणे म्हणता येईल, असा आशावाद कुसुमावती देशपांडे व्यक्त करतात.[४] माध्यमातील भेदांची बाजू वगळता आधुनिक कादंबरी आणि कीर्तन, पोवाडे, लावण्या यांच्यातील जीवनदर्शनाची कार्यपद्धती समानच होती असे त्यांनी म्हटले आहे. भालचंद्र नेमाडे यांनाही कादंबरीची बीजे प्राचीन मराठी वाङ्मयात शोधली आहेत. नेमाडे लिहितात,"लीळाचरित्र, स्मृतिस्थळ, बखरी, महीपतीकृत चरित्रे हे रचनाप्रकार कादंबरीशी जुळणारेच आहेत. परंतु आपल्या कादंबरीकारांनी अनुकरणाने रूढ केली तीच कादंबरी, असा अंधविचार पुढे येऊन तीन पिढ्या त्यातच गेल्या.'[५]

कुसुमावती देशपांडे आणि भालचंद्र नेमाडे यांच्या विचारात तथ्य असले, तरी एकोणिसाव्या शतकातील मराठी कादंबरी इंग्रजी-फार्सीच्या संसर्गप्रभावातून आणि संस्कृतच्या संस्कारातून आकारास आली हे स्पष्ट आहे. मीनाक्षी मुखर्जी यांनी भारतीय कादंबरीच्या उदयाचा विचार मांडताना या साहित्य प्रकाराच्या वाढीला कारणीभूत असलेले घटक वासाहतिक देशातील कथन परंपरांमधूनही निर्माण झाले होते ते नमूद केले आहे. तथापि त्यांनी हेही स्पष्टपणे मान्य केले आहे की, 'कादंबरीच्या विकासात इंग्रजी शिक्षण आणि त्या शिक्षणातून पाश्चात्त्य साहित्य परंपरेचे झालेले दर्शन हे दोन घटक अत्यंत प्रभावी होते हे खरे आहे.'[६]

महाराष्ट्रातही हेच घडले असले तरी 'मुक्तामाला', 'मंजुघोषा' या रंजनप्रधान कादंबरी-परंपरेवरील संस्कृत आर्षकाव्याच्या वर्णनशैलीचा प्रभाव स्पष्ट आहे. म्हणजे मराठी कादंबरीने इंग्रजीचा प्रभाव आणि संस्कृतचा संस्कार स्वीकारला आहे. संस्कृतचा संस्कार स्वीकारण्याची प्रक्रिया ही प्रतिक्रियात्मक कृती असावी असे वाटून जाते. (१८५० नंतर झालेल्या संस्कृत नाटकांच्या अनुवादांवरून हेच जाणवते) मात्र या धांदलीत प्राचीन मराठी साहित्यातील कथन प्रकारांकडे पूर्ण दुर्लक्ष झाले. बाबा पदनमजी व हरिभाऊंनीही त्यांचा

स्वीकार केलेला नाही. अशा प्रकारे अर्वाचीन काळात मराठी साहित्याची प्राचीन मराठी साहित्याशी कुठलीही सांधेजोड राहिली नाही.

आधुनिक काळात महाकाव्याची जागा कादंबरीने घेतली आहे, असे म्हटले जाते. हे मत वादग्रस्त असले तरी महाकाव्याप्रमाणे कादंबरीत जीवनाचा एक विस्तृत पट वाचकासमोर उलगडला जावा अशी अपेक्षा असते हे नाकारता येणार नाही. विविधांगी समाजवास्तव सामावून घेणारा कथात्मक गद्य साहित्यप्रकार असे त्याचे वर्णन करता येईल. या दृष्टीने तो समकालीन समाजवास्तवाचा वाङ्मयीन दस्तऐवज ठरतो. आजच्या काळात लिहिली जाणारी ऐतिहासिक कादंबरीसुद्धा भूतकालीन सामाजिक वास्तव आकळण्याचा आणि ते शब्दरूपात साकार करण्याचा प्रयत्न करते. अर्थातच या प्रयत्नातून वर्तमानावरही नवा प्रकाश पडू शकतो.

कुठल्याही कलाप्रकाराप्रमाणेच कादंबरीचीही प्रकृती, सर्वमान्य अशी वस्तुनिष्ठ व्याख्या करता येईल, अशी नाही. कादंबरी हा शब्दमाध्यमातून व्यक्त होणारा आणि बदलत्या समाज वास्तवाला सामावून घेणारा गद्य साहित्यप्रकार असल्याने ही अडचण विशेषच जाणवते. ही वस्तुस्थिती लक्षात ठेवूनच कादंबरीच्या स्वरूपाविषयी चर्चा करणे सयुक्तिक ठरते.

मराठी समीक्षेत कादंबरीची तात्त्विक संकल्पना मांडण्याचे प्रयत्न फारसे झालेले नाहीत. हरिभाऊ, इतिहासाचार्य राजवाडे, श्री. व्यं. केतकर यांची कादंबरीच्या स्वरूपाविषयीची कल्पना प्रगल्भ होती. परंतु आपल्या एतद्विषयक विचारांची सुस्पष्ट वा सांगोपांग मांडणी त्यांनी केलेली नाही. परिणामी 'प्रतिभा-साधन' सारख्या पुस्तकांमुळे चुकीच्या कल्पना प्रसृत झाल्या व रूढही झाल्या.

इंग्रजीत ज्याप्रमाणे Novel, Fiction, Historical Romance असे भेद केले जातात तसे ते मराठीत केले जात नाहीत. त्यामुळे रंजनप्रधान कादंबऱ्या आणि जीवनदर्शनप्रधान गंभीर कादंबऱ्या 'कादंबरी' या एकाच सदरात ढकलल्या जातात. परिणामी कादंबरीच्या संकल्पनेविषयीचा गोंधळ अधिकच वाढतो. अलीकडे भालचंद्र नेमाडे, उषा हस्तक यांच्या लेखनामुळे कादंबरी म्हणजे काय, याची समज मराठी समीक्षेला येऊ लागली आहे. तत्पूर्वी कुसुमावती देशपांडे, नरहर कुरुंदकर, दुर्गा भागवत (केतकरी कादंबरी) यांच्या लेखनाचा उल्लेख आवश्यक ठरतो. दुर्गा भागवत यांनी कादंबरीच्या स्वरूपाविषयीचा तात्त्विक विचार वस्तुनिष्ठपणे मांडला आहे.

इंग्रजीत मुळात Novel हा शब्द कादंबरीचे Romance पासूनचे वेगळेपण दर्शविण्यासाठीच उपयोजिला गेला. परंतु त्यांच्या वापरात गल्लत होऊ लागली तेव्हा Clara Reeve या विदुषीने त्यांच्यातील भेद स्पष्टपणे दाखवून दिला. त्यातून कादंबरीच्या प्रकृतीवर सखोल प्रकाश पडतो. Clara Reeve लिहिते, 'The Romance, is an

heroic fable, which treats of fabulous persons and things. The Novel is a picture of real life and manners, and of the times in which it is written. The Romance in lofty and elevated language, describes what never happened nor is likely to happen. The Novel gives a familiar relation of such things, as pass every day before our eyes, such as may happen to our friend, or to ourselves; and the perfection of it, is to represent every scene, in so easy and natural a manner, and to make them appear so probable, as to deceive us into a persuatioin (at least while we are reading) that all is real, until we are affected by the joys or distresses, of a persons in the story, as if they were our own." [7]

इतर सर्व वाङ्मयप्रकारांचे सत्त्व पचवून मानवी मन, जीवन आणि त्याभोवतीचा समाज यांच्या शोधासाठी कटिबद्ध असलेला कादंबरी हा एक वैशिष्ट्यपूर्ण वाङ्मयप्रकार होय. इतर वाङ्मयप्रकार आपल्या परीने जीवनशोधात सहभागी झालेले असतातच. तथापि कादंबरी या साहित्यप्रकाराकडून आपण नेहमीच गांभीर्यपूर्वक जीवनदर्शनाची अपेक्षा बाळगत आलो आहोत. कादंबरी या साहित्यप्रकारानेही आपली ही अपेक्षा पूर्ण केली आहे. कारण कादंबरीची प्रकृतीच मुळात जीवनवास्तवसन्मुख अशी असते. या दृष्टीने कादंबरी हा मानवी मनाचा व जीवनाचा एक वास्तवतापूर्ण कलारूप वेध असतो.

आपले कलारूप सांभाळून विविधांगी सामाजिक वास्तव चित्रित करण्यात कादंबरी किती यशस्वी होते यावर तिचे कादंबरीपण अवलंबून असते. तिचा चित्रफलक विस्तृत असल्याने अनेक आशयकेंद्रे ती आपल्या संरचनेत सामावून घेते. कादंबरीची व्याख्या करता न येण्याचे कारण तिच्या या बहुआयामी प्रकृतीतच दडलेले आहे. तसेच बदलत्या काळानुसार कादंबरीच्या स्वरूप-प्रयोजनातही बदल होत गेले आहेत. म्हणूनच टीकाकार कादंबरीचे स्वभावविशेष सांगतात, परंतु व्याख्या देत नाहीत, देऊ शकत नाहीत.

कादंबरीची व्याख्या करता येत नाही म्हणून तिचे स्वरूपविशेष डोळ्यांसमोर असू नयेत असे मात्र नव्हे. सामान्यपणे विषयवस्तू (Theme), कथानक (Plot), व्यक्तिरेखन (Characterization), सामाजिक वातावरण या अर्थाने पार्श्वभूमी (Setting), लेखकाचा दृष्टिकोण (Point of View) असे कादंबरीचे काही विशेष सांगता येतील. कोणताही कादंबरीकार काही व्यक्तींची विशिष्ट सामाजिक वातावरणात घडलेली कथा सांगत असतो. म्हणजे कादंबरीला कालपरिमाण अपरिहार्यपणे अनुसरावे लागते. याचा अर्थ हे कादंबरीचे अनिवार्य घटक आहेत आणि ते प्रत्येक कादंबरीत असतातच असे नाही. त्यांना घटक म्हटले तर त्यांचेही काटेकोर स्वरूप ठरविता येत नाही. उदा. कथानक म्हटले म्हणजे गुंतागुंतीचे रहस्यपूर्ण कथानक आपल्या डोळ्यांसमोर येते. परंतु नव कादंबरीने

कथेविषयीची आपली कल्पना बदलून घेण्यास भाग पाडले आहे. तेच इतर विशेषांबाबतही म्हणता येईल.

कादंबरीत काही विशिष्ट व्यक्तीच फक्त चित्रित होत असल्या, तरी त्या व्यक्ती व तत्संबंधी घटना-प्रसंगांच्या माध्यमातून लेखक जीवनाविषयीच्या काही सामान्य सत्यांची प्रतीती घडवीत असतो. कादंबरी ही विशिष्ट व्यक्तींच्या संदर्भात विशिष्ट समाजवास्तवात व कालावकाशात घडलेली एक भाषिक घटनाच असते. म्हणूनच विशिष्ट कालावकाशात घडणाऱ्या घटनांची मालिका कादंबरीत उलगडत जाते. लेखक जे जीवन चित्रित करतो त्यातून त्याचा स्वतःचा म्हणून एक दृष्टिकोण व्यक्त होतोच. एका परीने त्याला जीवनाचा जो प्रत्यय आलेला असतो त्याचाच आविष्कार त्याने कादंबरीतून केलेला असतो.

कादंबरीत चित्रित झालेले विश्व जीवनातूनच केलेली ती एक निवड असते या अर्थाने आणि चित्रित झालेले विश्व अगदी ओळख पटवून देता येईल अशा प्रत्यक्ष घटनाप्रसंगांवर आधारित नसते या अर्थाने कल्पितच असते. परंतु या कल्पिताला येथे प्रत्ययक्षम वास्तवाची कळा प्राप्त झालेली असते.

क्लारा रिव्ह म्हणते त्याप्रमाणे कादंबरी हे आपल्या काळाचे चित्र असते असे मानल्यानंतर तिच्यात सामाजिक जीवन आशयरूपाने येणे अपरिहार्य ठरते. व्यक्ती विशिष्ट सामाजिक वास्तवात जगत असते. व्यक्तींचे परस्परांशी जे संबंध येतात त्यातच सामाजिकता अनुस्यूत असते. कारण व्यक्ती ही सामाजिक वास्तवाचा व समाजाचा एक घटक असते. सामाजिकतेशिवाय व्यक्तीच्या जीवनाला अर्थपूर्णता लाभत नाही. म्हणूनच कादंबरीत व्यक्ती-कुटुंब-समाज असे संबंध चित्रित होतात. कादंबरीत काही विशिष्ट व्यक्तींचे जीवन चित्रित होत असले तरी अंतिमतः त्या व्यक्तींच्या माध्यमातून मानवी स्वभावच चित्रित झालेले असतात. सामाजिक वास्तवापासून व्यक्तींचा वेगळा विचार संभवत नाही म्हणून कादंबरीतील व्यक्तींच्या चित्रणास आपाततःच सामाजिक अंग लाभते. कादंबरीत चित्रित झालेल्या व्यक्तींचे अनुभव व्यक्तिविशिष्ट असले तरी मानव जातीस प्रतीतीच्या पातळीवर स्वसापेक्ष वाटत असल्याने कादंबरीतील जीवनचित्रणास विश्वात्मकतेचे (Universal) परिमाण लाभते.

अनुभवाच्या आंतरिक लयीवर कादंबरीचा घाट अवलंबून असतो. प्रत्येक कादंबरी हे एक स्वतंत्र कलारूप असल्याने ती आपला स्वतःचा स्वतंत्र घाट घेऊनच अवतरते. याचा अर्थ कादंबरी हा वाङ्मयप्रकार रूढ रचनाविषयक परंपरा हेतुतः अनुसरत नाही असा नसून नव्या कादंबरीला रूढ तंत्र आपल्या अभिव्यक्तीसाठी सुयोग्य वाटेलच असे नाही, असा आहे. नव्या कादंबरीचे आशयद्रव्य नवा घाट अपेक्षिते. यातून नवे रचनातंत्र, नवा घाट जन्म घेतो. नवी कादंबरी परंपरा अनुसरतच नाही असे नाही. कादंबरीचे शाश्वत स्वभावविशेष तिच्यात असतातच पारंपरिक रचनातंत्राचा सांकेतिकपणे स्वीकार न करता परंपरा पचवून



अनुक्रमणिका

निर्मितीच्या नव्या मानदंडाचे सृजन ती करते.

थोडक्यात, कादंबरी हा समाजवास्तवनिष्ठ असा साहित्यप्रकार आहे. मानवी मन, जीवन आणि त्याभोवतीचा समाज यांच्या प्रत्ययकारक चित्रणासाठीच खरी कादंबरी लिहिली जाते. आपल्या कादंबरीतून जे विश्व कादंबरीकार उभे करीत असतो त्याद्वारे त्याला आपली म्हणून काही विशिष्ट भूमिका स्पष्ट करावयाची असते. शैली हा कादंबरीचा स्वतंत्र विशेष वा घटक मानता येत नाही. कारण शैली हे आशयाचे भाषामाध्यमातील अभिव्यक्त रूप होय. म्हणजे शैलीविशेष हे स्वतंत्रपणे लक्षणीय नसतात. त्यांना अर्थपूर्णता प्राप्त होते ती आशयाच्या संदर्भातच. शेवटी वा. ल. कुलकर्णी आणि उषा हस्तक लिहितात त्याप्रमाणे कल्पित गोष्टीप्रमाणे कादंबरीचे रूप कथात्म असले तरी तिच्या कथात्मरूपाच्या अभिव्यक्तीत अंतर्भूत असलेली जीवनदर्शनाची जाणीव अधिक महत्त्वाची असते. वाचकाचे चार घटका मनोरंजन करण्यासाठी खऱ्या कादंबऱ्या जन्माला येत नाहीत. जीवनानुभूतीचा अपरिहार्य असा कलात्मक आविष्कार म्हणून त्या अस्तित्वात येतात.[८]

संदर्भ -


१. भागवत, दुर्गा : केतकरी कादंबरी, मौज प्रकाशन गृह, मुंबई, आवृत्ती पहिली १९६७, पृ.७.

२. मुखर्जी, मीनाक्षी : तौलनिक साहित्याभ्यास : तत्त्वे आणि दिशा (संपा. चंद्रशेखर जहागीरदार), सौरभ प्रकाशन कोल्हापूर, आवृत्ती पहिली १९९२, पृ. २४२.

३. देशपांडे, कुसुमावती : मराठी कादंबरीचे पहिले शतक, मुंबई मराठी साहित्य संघ, आवृत्ती दुसरी १९७५, पृ. १५

४. तत्रैव, पृ. १५-१६

५. नेमाडे भालचंद्र : टीकास्वयंवर, साकेत प्रकाशन औरंगाबाद, आवृत्ती पहिली १९९०, पृ. १९६

६. मुखर्जी, मीनाक्षी : तत्रैव, पृ. २४२.

७. Reeve, Clara : Novelists on the Novel (By Miriam Allott), Routledge and Kegan Paul London, Reprinted in 1975, Page No. 47.

८. कुलकर्णी वा.ल. आणि हस्तक उषा : मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड पाचवा, भाग पहिला, (संपा. रा.श्री. जोग), महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, आवृत्ती पहिली १९७३, पृ. ४१६


(आम्रपाली-४२, रंकाळा पार्क, कोल्हापूर ४१६०१०)

:द. श्री. बापट

# सर विल्यम जोन्स : एक सच्चा ज्ञानोपासक

अठराव्या शतकाच्या अखेरीस आणि एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस हिंदुस्थानच्या राजकीय पटाचे रंग झपाट्याने बदलत होते. पानिपतच्या दुसऱ्या युद्धातील अपरिमित मनुष्यहानीमुळे आणि अंतर्गत विघटनामुळे मराठी सत्ता खिळखिळी झाली होती. मोगल साम्राज्य संपल्यातच जमा होते. बंगाल, अवध इत्यादी सुभे सवतेसुभे बनले होते. दक्षिणेत निजाम, टिपू सुलतान, अर्काटचे नबाब स्वतंत्र राज्ये स्थापून होते. मराठी सत्तेसह सारे ईस्ट इंडिया कंपनीच्या तैनाती फौजेच्या पाशाने जखडले जात होते. क्लाइव्ह, वॉरन हेस्टिंग्ज, वेलस्ली बंधू, कॉर्नवालिस, एलफिन्स्टन इत्यादी एकाहून एक कर्तबगार पराक्रमी पुरुष ईस्ट इंडिया कंपनीच्या म्हणजे पर्यायाने इंग्लंडच्या साम्राज्यसत्तेचा पाया हिंदुस्थानात घालीत होते. ईस्ट इंडिया कंपनीची निर्विवाद अधिसत्ता प्रथम बंगालमध्ये प्रस्थापित झाली आणि १७७२ साली ख्यातनाम वॉरन हेस्टिंग्ज बंगालचा गव्हर्नर बनला.

इंग्लंड या वेळी औद्योगिक क्रान्तीच्या उंबरठ्यावर होते. जागतिक व्यापारात त्याचे स्थान अग्रगण्य होते. अमेरिकेतील इंग्रजी वसाहती स्वतंत्र झाल्यावर प्रबळ इंग्रजी सत्तेचे लक्ष इतरत्र वळले होते. भौतिक शास्त्रांचा अभ्यास, यंत्रसंस्कृती, सीमित राजसत्ता, अनेक शतकांची परंपरा असलेली विद्यापीठे, साहित्य आणि कला यांचा प्रगत वारसा, यांमुळे इंग्लंडचे युरोपमधील स्थान वरच्या दर्जाचे होते. ईस्ट इंडिया कंपनीला पाठबळ होते ते इंग्रजी राजसत्तेचे.

१७७३ साली ईस्ट इंडिया कंपनीच्या अनिर्बंध सत्तेला आळा घालण्यासाठी पार्लमेंटने इंडिया ॲक्ट पास करून कलकत्त्यास एक न्यायालय स्थापन केले. १७८१ साली या न्यायालयाची व्याप्ती वाढवून त्याचे रूपांतर सर्वोच्च न्यायालयात (Supreme Court) करण्यात आले. या न्यायालयासाठी न्यायाधीश नेमण्याचा अधिकार इंग्लंडमधील मंत्रिमंडळाला मिळाला. हिंदू आणि मुसलमान यांच्यांत प्रस्थापित रूढींनुसार मालमत्तेची वाटणी, वारसाहक्क, विवाहविषयक, दोन पक्षांतील करारमदार यांच्याबाबत हिंदू अगर मुसलमानी कायद्याचा वापर करण्याचा निर्देश या सर्वोच्च न्यायालयाला मिळाला.

१७८३ साली या सर्वोच्च न्यायालयाच्या रिकाम्या असलेल्या एका न्यायाधीशपदावर विल्यम जोन्सची नेमणूक करण्यात आली.

१७४६ साली लंडनमध्ये विल्यम जोन्सचा जन्म झाला. त्याचे वडील गणितज्ञ होते.

सर आयझॅक न्यूटन आणि हॅलेच्या धूमकेतूचा संशोधक ज्योतिर्विद हॅले यांचे ते समकालीन होते. रॉयल सोसायटीचे उपाध्यक्ष असलेले विल्यम जोन्स (थोरले) धाकट्या जोन्सच्या [१] जन्मानंतर तीन वर्षांतच निधन पावले.

हॅरोच्या प्रख्यात शाळेत जोन्सचे शिक्षण झाले. त्या काळच्या पद्धतीप्रमाणे लॅटिन आणि ग्रीक या अभिजात भाषा आणि थोडेफार गणित यांचा शिक्षणात समावेश होता. विलक्षण स्मरणशक्तीची त्याला देणगी होती. शेक्सपिअरचे 'टेंपेस्ट' हे नाटक त्याला तोंडपाठ होते. लॅटिन आणि ग्रीक वाङ्मयाची त्याला गोडी होती. स्वतंत्र कविताही तो लिहीत असे.

१७६४ साली ऑक्सफर्ड विद्यापीठातील युनिव्हर्सिटी कॉलेजमध्ये तो दाखल झाला. अरबी आणि फारसी या पौर्वात्य भाषा त्याने अभ्यासासाठी निवडल्या. सीरियामधील अलेप्पोचा रहिवासी असलेल्या एका अरब शिक्षकाला अरबी भाषा शिकण्यासाठी त्याने स्वतःच्या खर्चाने ठेवून घेतले होते. अरबी आणि फारसी या भाषांवर विद्वानांशी संभाषण करता येईल इतके निर्विवाद प्रभुत्व त्याने मिळविले होते. डेन्मार्कचे राजे सातवे ख्रिश्चन यांना महादी नावाच्या लेखकाने लिहिलेल्या तारिख एं नादिरी या नादिरशहाच्या बखरीचे फारसीमधून फ्रेंच भाषेत भाषांतर करून घ्यावयाचे होते. डेन्मार्कच्या राजाची मर्जी सांभाळल्यास फारसी विद्वान म्हणून युरोपभर ख्याती होईल, या आशेने जोन्सने हे काम स्वीकारले. भाषांतर राजेसाहेबांना पसंत पडले, कोपेनहेगनच्या रॉयल सोसायटीचे सन्माननीय सदस्यत्व मिळाले. पण फारशी प्राप्ती झाली नाही. नादिरशहाचे हे चरित्र १७७० साली दोन खंडांत प्रसिद्ध झाले.

१७७१ साली त्याने फारसी भाषेचे व्याकरण प्रसिद्ध केले. हा ग्रंथ विद्वद्मान्य झाला. याच्या पुढे अनेक आवृत्त्या निघाल्या. रॉयल सोसायटीचा फेलो होण्याचा मान त्याला मिळाला. डॉ. जॉन्सनच्या साहित्यमंडळाचे सदस्यत्व त्याला सहज मिळू शकले. या फारसी व्याकरणाची प्रत डॉ. जॉन्सनने बंगालचे गव्हर्नर वॉरन हेस्टिंग्ज यांना भेट म्हणून पाठविली होती. पौर्वात्य भाषांचा जाणता म्हणून त्याला या साहित्य मंडळात मोठी मान्यता होती. [२]

कायद्याचा अभ्यास त्याने व्यवसाय म्हणून केला होता. जामीनविषयक कायदा (Law of Bailment) या विषयावरील निबंध आणि अरबी कायदातज्ज्ञ इब्न अलमुलाकिन यांच्या 'बक्त अल् बाहित' या वारसाविषयक कायद्याच्या ग्रंथाचे इंग्रजी भाषांतर त्याच्या व्यासंगाची साक्ष देतात.

वकिली पेशातील अनेकांना राजकारणात रस असतो. तरुण जोन्सच्या मनात

---

१. विल्यम हे दोघांचेही नाव. अशा प्रकारे नामकरण करण्याची युरोपमध्ये पद्धत आहे.

२. जोन्सला अवगत असणाऱ्या भाषा— ग्रीक, लॅटिन, फ्रेंच, इटालियन, स्पॅनिश, पोर्तुगीज, हिब्रू, अरबी, फारसी (कामलचाऊ चिनी).

राजकारणाचे आकर्षण मोठे प्रबळ होते. उदारमतवादी विग पक्षाच्या राजकारणात त्याला रस होता; पण राजकारणातील झुंडशाहीचे गणित त्याला जमले नाही आणि तो राजकारणापासून माघारी वळला. त्याच्याइतका स्वतंत्र विचार करणारा कोणत्याही राजकीय पक्षात नीट बसू शकला नसता.

वार्षिक ६००० पौंड पगारावर १७८३ च्या अखेरीस पदसिद्ध पदवीमुळे आता 'सर' बनलेला विल्यम जोन्स सपत्नीक कलकत्त्यास न्यायाधीश म्हणून दाखल झाला. त्या वेळी त्याचे वय ३७ वर्षांचे होते. हिन्दुस्थानातील त्याचे वास्तव्य दहा वर्षांचे होते. [३]

ईस्ट इंडिया कंपनीच्या शासनात हिंदुस्थानात नोकरीसाठी आलेल्या इंग्रज सेवकांत दोन प्रकार होते. बरेचसे वशिल्याने दाखल झालेले. शिक्षणात मागे पडलेले. केवळ नशीब अजमावण्यासाठी आलेले. याउलट काही मात्र उच्चविद्याविभूषित, व्यासंगी, ज्ञानलालसा बाळगणारे. यातील काही फावल्या वेळात प्राच्य विद्या, भाषा, कला यांत रुची घेणारे होते.

विल्यम जोन्स हिंदुस्थानात येण्यापूर्वी चार्लस विल्किन्स (पुढे सर चार्ल्स) नाथानिएल हॉलहेड यांचा आणि पुढील काळात जॉनशोअर, फ्रान्सिस ग्लॅडविन, जॉन कारनॅक, जोनाथान डंकन, विल्यम चेंबर्स आणि हेन्री कोलब्रुक यांची नावे प्राच्यविद्येच्या संदर्भात घ्यावी लागतील. विल्किन्सला महाविद्यालयीन शिक्षणाचे पाठबळ नव्हते, पण तो प्रयत्नपूर्वक संस्कृत शिकला. भगवद्गीतेचे पहिले इंग्रजी भाषांतर विल्किन्सने केले. कंपनीच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सकडे आपले वजन खर्ची घालून वॉरन हेस्टिंग्जने हे भाषान्तर १७८५ साली लंडनहून प्रसिद्ध करविले. हॉलहेडने फारसी भाषान्तराच्या आणि एतद्देशीय पंडितांच्या मदतीने मनुस्मृतीवर आधारलेले Ghentu Law [४] हे पुस्तक प्रसिद्ध केले होते. बंगाली मुद्रणाकरता खिळे बनविले गेले ते हॉलहेड आणि विल्किन्स यांच्या प्रयत्नामुळे. मनुस्मृतीचे भाषान्तर विल्किन्सने हाती घेतले होते; पण प्रकृतिअस्वास्थ्यामुळे त्याला इंग्लंडला परत जावे लागले.

अरबी, फारसी आणि संस्कृत या तीनही भाषा या अभ्यासकांच्या दृष्टीने सारख्याच महत्त्वाच्या होत्या. इस्लामी धर्मीयांचे सर्वांत प्रबळ सत्तास्थान जरी तुर्कस्थानात ऑटोमन साम्राज्याच्या स्वरूपात होते, तरी धर्म आणि कायदा यांचे प्रमुख पीठ अरबस्तानात असल्याने अरबी भाषा या जगाची धर्मभाषा होती. याउलट साहित्य, काव्य, तत्त्वज्ञान आणि कला या क्षेत्रांत फारसीचे स्थान अनन्यसाधारण होते. ती मध्य आशियातील सर्वांत प्रगत ज्ञानभाषा होती. मोगल सत्तेच्या प्रदीर्घ कालखंडात अनेक पुराणांची, उपनिषदांची, हितोपदेशापासून मनुस्मृतीपर्यंत अनेक ग्रंथांची फारसी भाषान्तरे झालेली होती. हॉलहेडचा आणि स्वतः गव्हर्नर वॉरन हेस्टिंग्ज यांचा फारसी ग्रंथसंग्रह मोठा होता.

---

३. १७९४ साली कलकत्त्यास यकृतदाहाच्या विकाराने तो अकस्मात वारला.

४. हिंदू या अर्थी Ghentu हा आता विचित्र वाटणारा शब्द तेव्हा प्रचारात होता.

हेस्टिंग्जच्या दूरदृष्टीचा आणि गुणग्राहकतेचा मुद्दाम उल्लेख केला पाहिजे. १७८४ साली, विल्किन्सचे भगवत्गीतेचे भाषान्तर प्रकाशित करावे, म्हणून ईस्ट इंडिया कंपनीच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सपैकी नाथानिएल स्मिथ यांना हेस्टिंग्जने बनारसहून लिहिलेले पत्र मोठे वाचनीय आहे. स्वतःकडे कमीपणा घेऊन हेस्टिंग्ज लिहितो– "मी काही फारसा शिकलासवरलेला नाही, मी हे लिहिणे थोडे धाडसाचे ठरेल. [५]" विल्किन्स आणि हॉलहेड यांच्या प्रयत्नांचा गौरव करून गीतेची महाभारतातील सारी पीठिका हेस्टिंग्ज थोडक्यात देतो. 'हा ग्रंथ (गीता) म्हणजे युरोपमध्ये ज्या वेळी संस्कृतीची किंचितही जाण नव्हती, तेव्हा लिहिलेला, मूलभूत तात्त्विक विचार, तर्क आणि भाषाशैली यांचा मोठा अजोड संगम आहे. ख्रिस्ती तत्त्वविचाराच्या तोडीचा हा विचार आहे."

"ज्यांना आपण पराभूत केले आहे, त्यांचा धर्म, तत्त्वज्ञान, परंपरा यांचा सहृदयतेने अभ्यास करून त्यांना समजावून घेतले, तर त्यांचे दास्याच्या श्रृंखलांचे ओझे जरा कमी होईल. [६] आमच्या आधीच्या राज्यकर्त्यांनी अनेक शतके राज्य केले, पण प्रजेच्या धार्मिक परंपरेचा विचार केवळ तिच्या अवहेलनेसाठी, किंवा आपल्या अनुदार धर्मविचारांना आधार शोधण्यासाठीच केला. साहजिकच आपले धार्मिक आणि तत्त्वज्ञानविषयक विचार परक्यांना समजावून सांगण्यास हिंदूही फारसे उत्सुक नसतात."

एका तत्त्वज्ञान परंपरेतील कल्पना दुसऱ्या अगदी भिन्न परंपरेतील लोकांना समजावून सांगणे कसे कठीण आहे, याचाही ऊहापोह हेस्टिंग्ज या पत्रात करतो. योग या शब्दाचा seperation of mind from notices of senses हा अर्थ सांगून ही संकल्पना युरोपियन जगाला अपरिचित आहे. केवळ काही रोमन कॅथालिक मठांतील आचारधर्मांत हिच्यासमान काही आचार आहेत, हे तो नमूद करतो. ध्यानधारणा करणारा एक साधक बनारसला एका मंदिरात आपण प्रत्यक्ष पाहिल्याचे सांगून हेस्टिंग्ज पुढे लिहितो, "शरीराचे इतर अवयव जसे व्यायामाने घोटीव बनवता येतात त्याप्रमाणे मनालाही अभ्यासाने अशी शिस्त लावता येते." भगवद्गीतेतील शेवटचा प्रश्न हेस्टिंग्ज उद्धृत करतो.

*कच्चिदेतंच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेणचेतसा*
*कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय*

Hath what I have been speaking Arjuna, been heard with thy mind fixed to one point?

"हा ग्रंथ कदाचित कोणाला कालबाह्य, भ्रामक वाटेल, तर कोणाला नेमका याच्या उलट अनुभव येईल, या अनपेक्षिताचे श्रेय ग्रंथाचे आणि वाचकाच्या गुणग्राहकतेचे."

---

5. I an unlettered man, venture to prescribe.
6. It reduces the weight of chains with which the natives are held in subjection.



अनुक्रमणिका







हे पत्र वाचल्यावर लक्षात येते की वॉरन हेस्टिंग्ज शिकला-सवरलेला नसेलही, पण अंगभूत शहाणपण त्याच्याजवळ भरपूर होते.

आणखी एका कारणाने वॉरन हेस्टिंग्जला प्राच्य विद्याभ्यासात रस होता. बंगालमध्ये ईस्ट इंडिया कंपनीच्या सेवेत तो अगदी तरुण वयात दाखल झाला होता. हिंदुस्थानातील रीतिरिवाजांचे त्याचे ज्ञान उत्तम होते. १७७२ साली बंगालचा गव्हर्नर बनल्यावर बंगालमध्ये न्यायदानाचे काम कसे चालवावे, यासंबंधी त्याचे विचारान्ती बनलेले मत एतद्देशीय कायदेकानूंना शक्यतो धक्का लावू नये, असे होते. जुन्या रोमन साम्राज्याची पद्धतही अशीच होती. यामुळे जित प्रजेला एक प्रकारचा दिलासा वाटतो. हा स्थानिक कायदा एक तर शरियतवर आधारलेला इस्लामी अगर धर्मशास्त्रावर आधारलेला हिंदू कायदा होता. या कायद्याचे सारग्रंथ तयार करणे ही हेस्टिंग्जची व्यावहारिक गरज होती.

त्या काळच्या बंगालच्या सुभ्यात आताचा बिहार आणि ओरिसाचा काही भागही मोडत असे. या प्रदेशाची लोकसंख्या २ कोटींहून अधिक होती. एवढ्या लोकसंख्येसाठी विधिसंहिता बनविण्याची जबाबदारी जोन्सने स्वीकारली. कंपनीच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सनी न्यायसंहितेचा हा प्रस्ताव मान्य करून खर्चाला मंजुरी दिली. हिंदू कायद्याच्या दायभाग संहितेसाठी पंडित राधाकान्त शर्मा यांची, तर मिताक्षरा संहितेसाठी पंडित सर्वोरू त्रिवेदी यांची मासिक ३०० रु. वेतनावर नेमणूक करण्यात आली. त्या काळचे धर्मशास्त्राचे गाढे अभ्यासक तर्क पंचानन जगन्नाथ यांनी या दोन्ही पद्धतींचा समन्वय करावा असे ठरले. प्रत्येक विद्वानाला मासिक १०० रु. पगारावर एकेक साहाय्यकही होता. अशीच नेमणूक इस्लामी कायद्यासाठी सिराज उल हक आणि मुहंमद कासीम यांची शिया व सुन्नी धर्ममतांच्या कायद्यासाठी करण्यात आली. या सारग्रंथांपैकी मनुस्मृतीचे भाषान्तर १७९३ साली तयार झाले. कंपनी सरकारने त्याच्या छापील प्रती दिवाणी न्यायालयांतील न्यायाधीशांना पाठविल्या. जगन्नाथ तर्कपंचानन यांनी 'विवादभंगार्णव' या नावाने आपला ग्रंथ प्रसिद्ध केला, पण हा काही प्रमाण ग्रंथ होऊ शकला नाही. इतर संकल्पित ग्रंथ हेन्री कोलब्रुकने जोन्सच्या मृत्यूनंतर संपादित केले. शेवटचा ग्रंथ प्रसिद्ध होण्यास १७९७ साल उजाडले.

जोन्सचा संस्कृत भाषेचा अभ्यास न्यायसंहितेसाठी धर्मशास्त्र शिकण्यासाठी सुरू झाला. जोन्सचे संस्कृत शिक्षक पंडित रामलोचन [७] आणि अभ्यासाचे पहिले पुस्तक हितोपदेश. ज्येष्ठ अभ्यासक चार्लस विल्किन्स यांचे ऋणही जोन्स मान्य करतो. रोज

---

७. पंडित रामलोचन वैद्य ज्ञातीचे होते. बंगालमधील ज्ञातिसंस्थेत वैद्यांचे स्थान ब्राह्मणापेक्षा जरा खालचे होते. आयुर्वेदाच्या अभ्यासाची त्यांची परंपरा होती, पण वेदाभ्यास त्यांना करता येत नसे. पंडित रामलोचन यांना साहित्यात मोठा रस होता. सरस्वतीपुत्र म्हणून कवींबद्दल त्यांना नितान्त आदर वाटे. कालिदास सरस्वतीचा लाडका पुत्र म्हणून पंडितांच्या अभिमानाचा विषय होता.

सकाळी सूर्योदयापूर्वी उठून सकाळी ७ ते ८ तो संस्कृतचा पाठ घेई. सकाळी ८ नंतर रोज एक तास तो आलटून पालटून अरबी अगर फारसी विद्वानांजवळ वाचन, चर्चा इत्यादी रीतीने अभ्यासात घालवीत असे. या अभ्यासात बहुभाषापटुत्वाचा लाभ जोन्सला निश्चित झाला असेल. अशा अभ्यासकांना एक प्रकारची मानसिक शिस्त असते आणि परिश्रमांची सवय असते. नवद्वीप (नदिया) विभागातील कृष्णनगर येथे तो सुटीच्या दिवसात राहत असे. या नवद्वीपातील संस्कृत अध्ययन परंपरा फार मोठी होती. नवद्वीपाला जोन्स आपले तिसरे विद्यापीठ मानतो (ऑक्सफर्ड आणि लंडन ही आधीची दोन).

देववाणीमध्ये पंडितांशी संभाषण करता येईल इतके प्रावीण्य जोन्सने पाच-सहा वर्षांत संपादन केले. १७९१ साली वॉरन हेस्टिंग्जला लिहिलेल्या पत्रात तो हे अभिमानाने नमूद करतो. हितोपदेशाचे भाषान्तर विल्किन्स आणि जोन्स यांनी वेगळे वेगळे केले आहे. १७८४ साली संस्कृत प्रतीके वापरून Hymn to Camadeo कामदेव स्तोत्र ही कविता जोन्सने लिहिली, तेव्हा संस्कृतचे त्याचे ज्ञान तोकडे होते. मदनासंबंधीची सारी माहिती त्याला विल्किन्सने पुरविली होती. दुर्गा, लक्ष्मी, भवानी, सरस्वती, नारायण या देवतांवर त्याने स्तोत्रे इंग्रजीत लिहिली, त्यावर कुमारसंभवाच्या कथेची आणि मनुस्मृतीच्या पहिल्या अध्यायाची छाया आहे. गंगेवर लिहिलेल्या स्तोत्रात काशीच्या देवालयांचा विध्वंस करणाऱ्या औरंगजेबाचा [८] उल्लेख सिंहासनावर वसलेला असुर (औरंगासुर) म्हणून कसा करण्यात येई याचा उल्लेख आहे. गीत गोविंद, शाकुंतल आणि ऋतुसंहार [९] यांची भाषान्तरे आणि मनुस्मृतीचे भाषान्तर जोन्सच्या संस्कृत व्यासंगाची साक्ष देतात. महाभारताचे प्रत्यक्ष वाचन जोन्सने केले नव्हते. पण फारसी भाषान्तराच्या स्वरूपात महाभारताची कथा त्याला माहीत होती. महाभारतातील युधिष्ठिर, अर्जुन, कर्ण आदी योद्धे त्याला ग्रीक महाकाव्यातील, इलियडमधील ॲगॅमेनॉन, ॲजॅक्स, आचिलिस यांच्याहून श्रेष्ठ दर्जाचे वाटले. गीतगोविंदामुळे तो 'गोपियां'च्या प्रेमात पडला. क्रिशन आणि राम यांच्याबद्दल त्याच्या मनात पूज्य भावना होती. प्लेटो आणि पायथागोरस या ग्रीक तत्त्वज्ञान्यांनी सांख्य तत्त्वज्ञानाची उसनवारी केली असावी, असा त्याचा अंदाज होता. ख्रिस्ती धर्मविचारावर त्याची गाढ श्रद्धा होती, तरीही हिंदूंची पुनर्जन्माची कल्पना त्याला अधिक तर्कशुद्ध वाटते. ही कल्पना माणसाला अधिक पापभीरू बनविणारी आहे. अंतिम न्यायदानाच्या दिवसाची वाट पाहत बसण्याच्या आणि न्यायदानानंतर कधीही न संपणाऱ्या शिक्षेला सामोरे जाण्याच्या ख्रिस्ती कल्पनेपेक्षा पुनर्जन्म आणि कर्मविपाक माणसाला अधिक आशावादी बनविण्यास मदत करू शकतील, असे त्याला विचारान्ती वाटू लागले होते.

---

८ फारसी भाषापटु जोन्सला 'औरंगजेब' म्हणजे सिंहासनालंकार (ध्र्हैसहू र्द ूप ऊप्देहा) हा खरा अर्थ माहीत आहे.

९ हितोपदेश — १७८६ गीतगोविंद १७८९, शाकुन्तल १७८९, ऋतुसंहार १७९२. मनुस्मृती १७९३.







भाषान्तरे आणि स्तोत्रे याव्यतिरिक्त बिहारमध्ये ऐकलेल्या लोककथेवर आधारलेले Enchanted Fruit, 'भारलेले फळ' नावाचे एक दीर्घ काव्यही जोन्सने लिहिले आहे. महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या 'जांभूळाख्यान' या लोककथेशी या काव्याचा चेहरामोहोरा जुळणारा आहे. कथा एकाच स्वरूपाची आहे, पण अभिव्यक्तीचे स्वरूप जोन्सच्या काव्यात वेगळे वळण घेते.

विल्यम जोन्सच्या उपक्रमशीलतेचा उल्लेख आदराने करावा लागेल. प्राच्य विद्यांच्या अभ्यासात अनेक घटनांचे श्रेय जोन्सला द्यावे लागते. बंगाल एशियाटिक सोसायटीचा तो आद्य संस्थापक. भारतीय भाषांची जननी संस्कृत हिचा युरोपला परिचय घडला तो जोन्सने केलेल्या शाकुंतलाच्या इंग्रजी भाषांतरामुळे. इंडो-युरोपियन भाषागटासंबंधीचा विचार याच जोन्सने आपल्या 'हिंदू' या निबंधात प्रथम मांडला.

विद्या आणि कला यांना सुसंघटित संस्थेच्या माध्यमाद्वारे उत्तेजन देण्याची पद्धत मुळात फ्रान्समध्ये पंधराव्या लुईच्या कारकीर्दीत सुरू झाली. १७५१ मध्ये इंग्लंडमध्ये सोसायटी ऑफ ॲन्टीक्विटीज (पुराण वस्तुसंशोधन संस्था) आणि १७६८ साली ख्यातनाम चित्रकार सर जोशूआ रेनॉल्ड यांच्या प्रयत्नाने कलाक्षेत्रात काम करणारी रॉयल ॲकॅडमी स्थापन झाली. डच साम्राज्यातील जावा आणि सुमात्रा बेटांत प्राच्यविद्यासंशोधनासाठी बटेव्हियन [१०] सोसायटी १७७८ मध्ये स्थापन झाली. बहुश्रुत जोन्सला या प्रयत्नांची माहिती असणे साहजिक आहे. १७८३ च्या नोव्हेंबरमध्ये जोन्स कलकत्यास येऊन पोहोचला. एशियाटिक सोसायटीची स्थापना झाली ती १५ जानेवारी १७८४ मध्ये. कलकत्ता सुप्रीम कोर्टाचे न्यायाधीश सर रॉबर्ट चेंबर्स त्या दिवशी भरलेल्या सभेच्या अध्यक्षस्थानी होते. प्राच्यविद्येची व्याप्ती अरबस्तान, इराण आणि हिंदुस्थान एवढ्या विशाल भूभागातील भाषा, संस्कृती, धर्म, साहित्य आणि कला यांच्याशी कशी निगडित आहे, हे जोन्सने विशद केले. प्राच्य विद्यांचा अभ्यास करणाऱ्या संस्थेचे नाव यामुळे बेंगॉल एशियाटिक सोसायटी असे ठेवावे असे ठरले. वॉरन हेस्टिंग्ज आश्रयदाता तर स्वतः जोन्स अध्यक्ष. सुरुवातीस सोसायटीच्या सदस्यांची संख्या केवळ ३० होती. सोसायटीच्या सभांना जेमतेम ७-८ मंडळी हजर असत.

या हौशी प्राच्य विद्याभ्यासकांना अनेक विषयांत रुची होती. संस्कृतोद्‌भव नावे रोमन लिपीत कशी लिहावीत याकरता शास्त्रशुद्ध पद्धत तयार करण्यापासून [११] (Orthography) शिलालेख, ताम्रपत्रे यांतील जुन्या लिपीचा उलगडा, पुराणात वर्णन केलेल्या राजपुरुषांचा आणि घटनांचा काळ ठरविणे, ग्रीक इतिहासकारांनी लिहिलेल्या

१०. बटेव्हिया म्हणजे सध्याचे जकार्ता शहर.

११. जोन्सने सुचविलेली पद्धत देवनागरी लिपीवर आधारलेली होती. कंपनी सरकारने नेमलेल्या तज्ज्ञ समितीने पुढे डॉ. गिलख्रिस्ट यांची पद्धत स्वीकारली.

वृत्तांतावरून सिकंदराच्या कालखंडातील भारतीय व्यक्ती आणि स्थळे यांचा उलगडा, भारतीय भग्नावशेष आणि इतिहास यांची सांगड घालणे, संस्कृत, फारसी आणि अरबी भाषांतील जुनी हस्तलिखिते गोळा करणे, अशा अनेक स्वरूपांत हा व्यासंग होता. एशियाटिक सोसायटीच्या एशियाटिक रीसर्चेस या प्रकाशनाच्या प्रारंभीच्या वर्षांच्या अंकातील विषय याची साक्ष देतात. चंद्रगुप्ताचा काळ, पाटलीपुत्र म्हणजे सध्याचे कोणते शहर, नेलोरला सापडलेली रोमन नाणी, महाबलीपुरम्‌चे भग्नावशेष, दिव्य करण्याचा प्रकार, हिंदू विधवेची कर्तव्ये, सूर्यसिद्धांत, नीळ बनविण्याची अंभोर भागातील पद्धती, कुतुब-मिनाराची त्रिकोणमितीच्या साहाय्याने मोजलेली उंची (२४२ फूट ६ इंच, जेम्स ब्लंट, आर्मी इंजिनिअर) घारापुरी लेण्यांतील शिल्प, पानिपतच्या दुसऱ्या युद्धात प्रत्यक्ष हजर असलेल्या काशिराज पंडिताने फारसीमध्ये लिहिलेल्या वृत्तांताचा इंग्रजी अनुवाद असे हे विविध विषय आहेत.

प्रतिवर्षी एशियाटिक सोसायटीच्या वार्षिक सभेत अध्यक्षीय भाषण म्हणून विल्यम जोन्स एक अभ्यासपूर्ण निबंध वाचीत असे. १७८४ ते १७९४ पर्यंत हा क्रम अप्रतिहत चालला. १७८६ ला 'हिंदू' हा निबंधाचा विषय होता [१२].

'हिंदूंची स्थिती सध्या कितीही अवनत असली, तरी एक काळ असा होता की, हिंदू मोठे समर्थ होते. त्यांच्या कला फार प्रगत होत्या. कायदेकानू सुयोग्य होते आणि राज्यकारभार आदर्श होता. ज्ञानाच्या सर्व शाखांत त्यांना गती होती. त्यांची भाषा, साहित्य, धर्म, तत्त्वज्ञान, शिल्प, वास्तुशास्त्र, शास्त्रीय ज्ञान याची साक्ष देतात.'

संस्कृत भाषेच्या सामर्थ्याने त्याला मोहिनी घातली. 'संस्कृत भाषा किती प्राचीन मानावी, हा वादाचा विषय ठरेल, या भाषेची घडण केवळ अद्‌भुत मानावी लागेल. ग्रीक भाषा हिच्या मानाने अप्रगत आहे. लॅटिन भाषेपेक्षा हिची शब्दसंपदा अधिक आहे. ग्रीक आणि लॅटिन भाषांपेक्षा संस्कृत अधिक नियमबद्ध आणि सुडौल आहे. तरीही एक गोष्ट ध्यानी घेतली पाहिजे. या तिन्ही भाषांत काही जवळीक आणि साम्य आहे. हे केवळ आपाततः किंवा योगायोगाने घडले म्हणणे बरोबर नव्हे. क्रियापदांची रूपे, व्याकरणाचे नियम, शब्दसाधर्म्य यामुळे अभ्यासकांना या तिन्ही भाषांचे मूळ एक असावे, या निष्कर्षाला यावे लागते. ही मूळ भाषा आता लोप पावली आहे.'

या निबंधामुळे 'इंडोयुरोपियन भाषा गट' या विषयाला चालना मिळाली. १८१६ साली फ्रान्झ बॉप या जर्मन अभ्यासकाने पाणिनीय व्याकरणाचा अभ्यास करून या भाषागटाचे तुलनात्मक व्याकरण लिहिले आणि संस्कृत भाषेबद्दल एक अद्‌भुतरम्य

१२. १७८७ इस्लामपूर्व अरबस्तान, १७८८ तार्तर संस्कृती, १७८९ इराणचा सांस्कृतिक वारसा, १७९० चिनी संस्कृती– भारतीय क्षत्रिय वर्णाशी असलेला संबंध, १७९४चे शेवटचे व्याख्यान आशियाई संस्कृती.










आकर्षण युरोपमध्ये, विशेषतः जर्मनीमधील अभ्यासकांत निर्माण झाले. मॅक्समुल्लरच्या मते अठराव्या शतकातील हा सर्वांत महत्त्वाचा शोध मानावा लागेल.

नीतिकथांद्वारे शिक्षण, दशांशपद्धती आणि बुद्धिबळाचा खेळ या हिंदूंनी जगाला दिलेल्या तीन देणग्या आहेत, असे जोन्स मानतो.

त्या काळातील या प्राच्यविद्याभ्यासकांची एक मर्यादा लक्षात घेतली पाहिजे. हे सारे अभ्यासक ख्रिस्ती धर्मावर दृढ निष्ठा बाळगणारे होते. बायबलमधील जगदुत्पत्ती, आदम आणि इव्ह यांचे स्वर्गातून झालेले पतन, महाप्रलयाची कथा, नोहाची नौका हा सारा कथाभाग ते अक्षरशः सत्य मानीत असत. ख्रिस्ती धर्मशास्त्राच्या अभ्यासकांनी ख्रिस्तपूर्व ४००४ या वर्षी जगदुत्पत्ती झाली असे अनुमानाने ठरविले होते. [१३] बायबलातील घटनांना सुसंगत अशी पुराणातील घटनांची कालमर्यादा ठरविण्याकडे या विद्वानांचा कल असे. विल्यम जोन्सही याला अपवाद नव्हता. पंडित राधाकांत शर्मा यांच्याकडून वॉरन हेस्टिंग्जने 'पुराणार्थ प्रकाश' नावाचा ग्रंथ लिहून घेतला होता. कालनिर्णयाचा विचार करताना जोन्सच्या नजरेसमोर हा ग्रंथ आणि भागवत पुराणाचे फारसी भाषांतर होते. जोन्सच्या मते कलियुगाची सुरुवात ख्रि. पू. ३००० वर्षे, रामाचा काल ख्रि. पू. २०२९, गौतम बुद्ध ख्रि. पू. १०२७, नंद ख्रि. पू. ६९२, बळी ख्रि. पू. १४९ तर विक्रमादित्य ख्रि. पू. ५६ असे होऊन गेले.

जोन्सची ज्ञानलालसा बहुमुखी होती. काही शास्त्रीय विषयांत त्याला रस होता. उभयतः पतिपत्नी हौशी वनस्पतिशास्त्रज्ञ होते. या शास्त्रातील वनस्पतींच्या संकलनाची, शास्त्रशुद्ध वर्णनाची आणि वर्गीकरणाची पद्धत जोन्सला माहीत होती. वनस्पतींत आढळणारी विविधता त्याला ईश्वराची अमूर्त भाषा वाटे. एशियाटिक रीसर्चेसमध्ये हिंदुस्थानातील वनस्पतींवर काही निबंध आहेत. सुमारे ४२५ वनस्पतींची अकारविल्हे केलेली यादी आहे. कृष्णनगरहून सर जोसेफ बॅन्कस् यांना १७९१ मध्ये लिहिलेल्या पत्रात फावल्या वेळात वेगवेगळ्या १७० वनस्पतिविशेषांचा अभ्यास केल्याचा उल्लेख आहे. हा अभ्यास करताना आधीच्या अभ्यासकांच्या अभ्यासाची दखलही घेतली आहे. मलबारमध्ये काही काळ राहिलेला डच संशोधक व्हॅन रीड हा या अभ्यासातील जोन्सचा पूर्वसूरी आहे. शास्त्राच्या पद्धतीप्रमाणे प्रत्येक वनस्पतीचे फुलाच्या, पानाच्या, फळाच्या संदर्भात पूर्ण वर्णन आकृतीसह जोन्सने केले आहे. मधूक, उत्पल, आम्र, मल्लीक माधवी, स्विश, पिंपळ, प्रियाल, मुचकुंद, बिल्व, केतकी, दूर्वा, कुश, चंदन, कुमुद, चित्रक, कामलता, नीप, बंधूक, कर्णिकार, अशोक, पाटली, पळस, कोविदार, सप्तपर्णी इत्यादी वनस्पतींचा समावेश या अभ्यासात आहे. संस्कृत भाषेतील वनस्पतींची नावे अभ्यासकांनी स्वीकारावीत, त्यांचे बेढब लॅटिन

---

१३. आर्चबिषप उशर यांच्या मते ख्रिस्तपूर्व ४००४ या वर्षात, तर डॉ. लाइटफूट यांच्या मते त्या वर्षी २३ ऑक्टोबरला, सकाळी ९ वाजता जगाची उत्पत्ती झाली. डॉ. जॉन्सनही जग निर्माण होऊन ५८०० वर्षे झाली असे मानीत असे.

नामकरण करू नये, असे त्याचे मत आहे. या वनस्पती काव्यात, साहित्यात कशा वावरतात, त्यांच्या नावांमधील भाषिक संदर्भ, धार्मिक दृष्ट्या काही वनस्पती पावित्र्याशी कशा निगडित आहेत याचाही विचार तो करतो. वनस्पतींच्या नामकरणात शक्य तेथे अमरकोशाचा वापर केलेला आहे. काही वनस्पतींबद्दल पंडितांमध्ये दुमत होते. बंधूक (दुपारी) फुलाचा उल्लेख कालिदास ऋतुसंहारात करतो. 'बंधूक कान्तिमधरेपु मनोहरेषु.' पण तीन पंडितांनी तीन वेगळी फुले बंधूकाची म्हणून सादर केली. कर्णिकार म्हणजे निश्चित कोणते फूल? बंगालमध्ये ग्रामीण भागात कंकर नावाचे जे सुंदर फूल आहे ते म्हणजे जोन्सच्या मते कर्णिकार. Nyctanthus या लॅटिन नामकरणात मोडणाऱ्या (रात्री फुलणारी सुवासिक फुले) शेफालिका या वनस्पतीला काहीजण चुकीने पारिजातक मानतात, पण पारिजातक हे कसे अगदी वेगळ्या जातीचे फूल आहे, हे तो स्वानुभवाने सांगतो. या निक्टॅन्थस प्रकारातील कुंद (नवमल्लिक) मल्लिका, मालती, जाती, यूथिका इत्यादींचा ऊहापोह झाला आहे. या मोगरीवर जोन्सचा जीव जडला आहे. Hymn to Prakriti, प्रकृतिस्तोत्र या आपल्या काव्याच्या प्रस्तावनेत 'मल्लिकामुकुले भाति गुंजन् मत्तमधुव्रतः। प्रयाणे पंचबाणस्य शंखमापूरयन इव' [१४] हा श्लोक कालिदासाचा म्हणून तो उद्‌धृत करून गोष्टीवेल्हाळ जोन्स पंडितांत रूढ झालेली आख्यायिका सांगतो. 'मोगरीच्या कळीचा आकार पाहता हे उलट्या बाजूने शंख फुंकणे नाही का,' असा प्रश्न कोणा टीकाकाराने म्हणे कालिदासाला विचारला. चतुर कालिदास उत्तर देतो, 'तो बोलून चालून 'धुंद मद्यपी' मत्तमधुव्रतः आहे, आपण काय करतो आहोत याचे भान त्याला थोडेच आहे?' जोन्सच्या मते काव्याच्या मागे रूक्ष वास्तवाचा ससेमिरा लावणाऱ्यांना हे उत्तर आहे. उत्प्रेक्षा अशी पूर्णार्थाने ताणावयाची नसते.

आमलिका म्हणजे चिंच. हिचे लॅटिन नाव Tamarindus जोन्सच्या मते फार असंस्कृत आहे. तमार ए हिंद (हिंदुस्थानचा खजूर) या अरबी नावाचा हा अपभ्रंश आहे. खजुराचे झाड आणि चिंचेचा वृक्ष यांची तुलनाच होऊ शकत नाही. यापेक्षा आमलिका मोठे अर्थवाही नाव आहे.

तृण वर्गातील शर, काश, दुर्वा, कुश यांचे सांस्कृतिक धागे त्याच्या परिचयाचे आहेत. कार्तिकेयाचा जन्म शर गवतात झाला. काश तुऱ्यावर आले म्हणजे पांढरेशुभ्र दिसते. कुश, दर्भांच्या स्वरूपात सर्व धर्मकृत्यांत कसे आवश्यक आहे, कुशाग्रबुद्धी हा शब्दप्रयोग कसा रूढ आहे. उशीर म्हणजे वाळा, याला अवदाह म्हणजे तापहारक हे नाव आहे. मदनपीडा झालेल्या शकुंतलेला वाळ्याची उटी तगमग कमी व्हावी म्हणून गौतमीने पाठविली, हे सारे बहुश्रुत जोन्सला माहीत आहे.

---

१४. मोगऱ्याच्या कळीवर रुंजी घालणारा, मधुपान करणारा धुंद झालेला भुंगा जणू कामदेवाच्या प्रयाण काळी शंखच फुंकीत आहे असे भासते.



अनुक्रमणिका






नागकेशर आणि कांचन जोन्सच्या मते एकच आहेत. कामदेवाच्या पाच बाणांत बंगालमधील परंपरेप्रमाणे नागकेशराचा समावेश होतो. [१५] 'नागकेशराला विपुल पिवळे पराग असणारी पांढरी सुवासिक फुले येतात. नैषध काव्यात हे फूल म्हणजे कामदेवाचे बाण घासून टोकदार करणारे चक्र, तर पिवळे पराग म्हणजे त्या वेळी उडणाऱ्या ठिणग्या, अशी कल्पना आली आहे.' सोनचाफ्याचे आणि भुंग्यांचे का कोणास ठाऊक पटत नाही. भारतीय स्त्रियांच्या काळ्याभोर केशपाशावर चाफ्याचे पिवळे फूल कसे सुरेख दिसते. जावा आणि सुमात्रा बेटांत चाफ्याची निळसर रंगाची एक जात आहे, अशी माहिती डच संशोधकांनी लिहून ठेवली आहे.'

चंदनावर लिहिताना एका मित्राने आपल्याला चंदनाच्या बिया कशा पाठविल्या, त्या रुजविण्याचा प्रयत्न कसा असफल झाला, हे सांगून झाल्यावर त्याला चंदनान्योक्ती आठवते [१६]. 'साऱ्या जगाला आनंद देणाऱ्या मित्रा चंदना, या वनात राहू नकोस, कारण वेड्यावाकड्या वाढलेल्या रूक्ष पोकळ बांबूंनी हे वन व्यापलेले आहे. हे एकमेकांवर घासणार, त्यांतून ठिणग्या उडणार. स्वतःचे कूळ तर हे जाळून घेतीलच, पण सारे वनही भस्मसात करतील.' दुर्वंशैः परुषैः असारहृदयैः मधील श्लेषही तो विशद करतो.

पळसावर लिहिताना संस्कृत साहित्यात अगदी वेदकाळापासून पळसाचे उल्लेख कसे येतात, आपण राहतो त्या कृष्णनगरच्या आजूबाजूस पळसाची दाट झाडी कशी आहे, प्लासीच्या लढाईमुळे प्रसिद्ध झालेले प्लासीचे मैदान 'पलाशी'चे भ्रष्ट रूप आहे, इत्यादींचे विवरण होते. नीप किंवा कदंब फुलल्यावर कसा सुरेख दिसतो. त्याच्या फुलांच्या दरवळाने नवीन मद्याच्या गंधाची आठवण कशी येते, त्यामुळे कोशात 'हलिप्रिय' [१७] हे नाव या वृक्षास दिले आहे.

रसायनशास्त्राच्या अभ्यासात त्याला रस होता. परमेश्वराचे वर्णन त्याने एके ठिकाणी Almighty Chemist असे केले आहे. हत्तिरोग (Elephantilis) त्या काळी बंगालमध्ये मोठा असाध्य रोग होता. त्यावरील देशी उपचारपद्धतीत सोमल (arsenic) वापरले जाई. या पद्धतीवर जोन्सने दोन लेख प्रसिद्ध केले होते.

जोन्स पतिपत्नींचे हिंदुस्थानातील वास्तव्य दहा वर्षांचे होते. एवढ्या मोठ्या पदास साजेसे कलकत्त्यातील अलिपूरचे त्यांचे निवासस्थान होते. नोकरचाकरांचा लवाजमा होता. वॉरन हेस्टिंग्जचे निवासस्थान शेजारी होते. दोघांचे कौटुंबिक संबंध स्नेहाचे होते.

१५. अशोक, मोगरा, आंब्याचा मोहोर, तांबडे कमळ आणि शिरीष हे कामदेवाचे पाच पुष्पमय बाण आहेत, असे इतरत्र मानले जाते.

१६. *लोकानन्दन चंदन द्रुमसखे नास्मिन् वने स्थीयतां । दुर्वंशैः परुषैरसारहृदयैराक्रान्तमेतद वनम् ।*
*ते ह्यन्योन्यनिघर्षजात दहनज्वालावली संकुलाः । न स्वान्येव कुलानि केवलमिदं सर्वं दहेयुर्वनम ॥*

१७. हलि म्हणजे बळिराम, याची मद्यप्रीती संस्कृत साहित्यात सर्वश्रुत आहे.

कृष्णनगरचे त्याचे सुट्टीत जाऊन राहण्याचे घर निसर्गरमणीय परिसरात होते. या पतिपत्नींना पाळीव प्राण्यांचा षोक होता. दोन मेंढे, एक वाघाचा छावा, एक मोठे कासव (त्याचे नाव ऑथेल्लो ठेवले होते) यांचे उल्लेख संबंधितांनी लिहिलेल्या आठवणींत येतात.

भ्रष्टाचाराच्या आरोपावरून वॉरन हेस्टिंग्जला इंग्लंडमध्ये परत बोलावण्यात आले. पार्लमेंटने त्याच्यावर महाभियोग (impeachment) चालविला. या प्रकरणात काही शिंतोडे जोन्सवरही उडले. जोन्सने ६०,००० पौंडांची माया जोडली आहे, असेही सूचित केले गेले. या प्रकाराची जोन्सला मोठी खंत वाटली. दहा वर्षांच्या हिंदुस्थानातील वास्तव्यानंतर त्याच्याकडे केवळ चोवीसहजार पौंड शिल्लक होते. त्याच्या वार्षिक पगाराशी हे सुसंगत होते. वॉरन हेस्टिंग्जला लिहिलेले अखेरचे पत्र ऑक्टोबर १७९१ मध्ये लिहिलेले आहे. 'तुमच्यावरील सर्व आरोप खोटे ठरून तुम्ही दोषमुक्त होणार याबद्दल मला खात्री आहे. इंग्लंडमध्ये परतल्यावर पोटापाण्याची चिंता न करता विद्याव्यासंगात काळ घालवावा, यासाठी अजून काही वर्षे हिंदुस्थानात कशी घालवावी लागतील, म्हैसूरचे राजकारण सध्या कसे जिकीरीचे झाले आहे, वाराणसीत श्री. विलफोर्ड यांना मिळालेल्या स्कंदपुराणाच्या पोथीत आफ्रिका, युरोप, इंग्लंड यांचा नावनिशीवार उल्लेख कसा येतो; हे या पत्रातले अन्य विषय आहेत. पत्राचा शेवट, 'महाशय, मला आपल्याबद्दल मनोमन आदर वाटतो, हे काही मी उपचार म्हणून लिहीत नाही.'[१८] असा केला आहे.

हिंदुस्थानातील उष्ण-दमट हवा दोघांनाही मानवली नाही. आल्या आल्या हिंदुस्थानात ऊन फार कडक असते, याची जाणीव हेस्टिंग्जने त्याला करून दिली होती, तरीही याबाबत दुर्लक्ष झाले आणि जोन्सला उष्माघाताचा तडाखा सहन करावा लागला. त्याची प्रकृती खूप खालावली आणि तो रोडावून गेला. आपल्याला उपलब्ध असलेले जोन्सचे चित्र इंग्लंडमधून तो निघण्यापूर्वी चित्रकार सर जोशूआ रेनॉल्ड यांनी काढलेले आहे. या चित्रात मात्र तो चांगला सुखवस्तू भासतो. १७९३ साली दुखण्यांना कंटाळून श्रीमती ॲनामरीया जोन्स इंग्लंडला परत गेली. दोन वर्षांनी जोन्सही परतणार होता, पण नियतीच्या मनात तसे नव्हते.

१७९४ साली कलकत्त्यास अगदी अल्पशा आजाराने यकृतदाहाच्या विकाराने जोन्स वारला. सरकारी इतमामाने त्याची अंत्ययात्रा निघाली. दुखवट्याच्या सभेत त्याच्या सोबत काम केलेल्या पंडितांना आणि मौलवींना त्यांचे अश्रू आवरेनासे झाले. भारतात आणि इंग्लंडमध्ये जाणत्या स्नेह्यांना जोन्सच्या निधनाने फार दुःख झाले. विल्यम जोन्सचे मूल्यमापन अगदी एका वाक्यात ऑक्सफर्डमधील त्याचा सहाध्यायी डॉ. पार यांनी केले आहे. 'It was fortunate such a man was born' हा असा माणूस जन्माला आला, हे अहोभाग्य होय.

(उत्तरार्ध पुढील अंकात)

(१०, सुनीता सोसायटी, १९/२ एरंडवणे, पुणे ४११००४)

---

18. Farewell my dear sir, and believe me to be with unfeigned regard.



अनुक्रमणिका






डॉ. गं. ना. जोगळेकर

# मराठी भाषेच्या अभ्यासातील एक महत्त्वपूर्ण टप्पा

कृ. श्री. अर्जुनवाडकर हे नाव मराठी व्याकरणाच्या क्षेत्रात सुप्रतिष्ठित आहे. परंपरागत पद्धतीने संस्कृतचे अध्ययन केलेले शास्त्री, ही त्यांची पहिली ओळख. कालांतराने महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करून प्रथम वाडिया महाविद्यालय आणि नंतर बरीच वर्षे स. प. महाविद्यालय येथे संस्कृतचे प्राध्यापक म्हणून अर्जुनवाडकरांनी लौकिक संपादन केला. त्यांचे गुरू प्रा. अरविंद मंगरूळकर यांच्या सहकार्याने त्यांनी काही पुस्तकांचे लेखन केले. त्यांत मम्मटाचा 'काव्यप्रकाश' (विद्यापीठीय अभ्यासक्रमात नेहमी नेमले जाणारे चार उल्लास) या ग्रंथामुळे काव्यशास्त्राचे चिकित्सक अभ्यासक म्हणून मंगरूळकर-अर्जुनवाडकर ही गुरु-शिष्यांची जोडी विशेष नावारूपाला आली. (अर्थात मराठी साहित्याच्या क्षेत्रात मंगरूळकरांना पुष्कळ आधीपासूनच मान्यता प्राप्त झाली होती, हा भाग वेगळा.) 'मराठी भाषेची घटना, रचना, परंपरा' हे या जोडीचे पुस्तक 'काव्यप्रकाशा'च्या आधीच प्रसिद्ध झाले होते. विशिष्ट अभ्यासक्रमासंबंधीचे पाठ्यपुस्तक या गरजेतून याही पुस्तकाची निर्मिती या लेखकद्वयाने केली होती. पण "प्रा. मंगरूळकरांनी मला मराठीच्या अभ्यासाकडे वळवले," असे अर्जुनवाडकर म्हणतात ते याच पुस्तकामुळे. स. प. महाविद्यालयात प्राध्यापक असताना त्यांनी लिहिलेले, 'कंटकार्जुनीय' हे संस्कृत काव्याचे पुस्तक मराठी वाचकांना तितकेसे माहीत नाही; पण अर्जुनवाडकरांची विनोदबुद्धी आणि व्यंगाचा उपहास करणारी त्यांची खोचक शैली यांचा परिचय या सुभाषितवजा काव्यामुळे होतो. विषय कोणताही असो– तत्वचर्चेचा असो, की इतिहासकथनाचा– अधूनमधून उपहासगर्भ शब्दयोजना करून संबंधितांना बोचकारे काढल्याशिवाय अर्जुनवाडकरांना राहवत नाही. वैचारिक या नावाखाली प्रसिद्ध होणाऱ्या पुष्कळ लेखनात वैचारिकतेचा अभाव असतो, विवेचन वरवरचे असते, आवश्यक अशी शास्त्रदृष्टीच नसल्यामुळे वर्ण्यविषयाचे सखोल ज्ञान कुठेच दिसत नाही, असा अनेकदा अनुभव येत गेल्यामुळे तो संताप व्यक्त करण्याची एक रीत म्हणून हा उपहासाचा मार्ग अर्जुनवाडकरांनी स्वीकारला असावा, असे म्हणता येईल. पण त्यामुळेच की काय गंभीर शास्त्रचर्चेतही तिरकसपणे बोलल्याशिवाय त्यांना राहवत नाही. तो त्यांचा स्वभावच बनून गेला आहे.







**व्याकरण-क्षेत्रातील संस्मरणीय कार्य**

मराठी व्याकरणाच्या अभ्यासाकडे खऱ्या अर्थाने अर्जुनवाडकर वळले ते त्यांनी स्वीकारलेल्या मोरो केशव दामले यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या पुस्तकाच्या संपादनामुळे. मराठीतील संपादनाचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून या पुस्तकाचा नेहमीच निर्देश करावा लागेल. अभ्यासकांची सोय पाहण्याची जी तत्परता अर्जुनवाडकरांनी या पुस्तकात दाखवली आहे, ती विशेष प्रशंसनीय आहे. दामल्यांच्या या बृहद्ग्रंथाचा साक्षेपाने अभ्यास करून त्यांनी या ग्रंथाला जोडलेल्या टीपा अर्जुनवाडकरांची या क्षेत्रातली जाणकारी दर्शवतात. व्याकरणकार म्हणून दामल्यांचे कार्य महत्त्वाचे खरे; पण त्यांच्या ग्रंथात शास्त्रीयतेचा कसा अभाव आहे, हे अनेक ठिकाणी त्यांनी सडेतोडपणे दाखवले आहे. या ग्रंथाच्या संपादनामुळे अर्जुनवाडकरांच्या कर्तृत्वाला एक वेगळीच दिशा मिळाली आणि मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागात व्याख्याता म्हणून त्यांची निवड झाली आणि मराठीचे प्राध्यापक म्हणूनच ते सेवानिवृत्त झाले. (प्रकाशक रा. ज. देशमुख यांच्याशी न पटल्यामुळे आणि आपल्यावर झालेला अन्याय वेशीवर टांगलाच पाहिजे या पोटतिडिकीमुळे अर्जुनवाडकरांचे नाव त्यांनी या संदर्भात विविध लेखांच्याद्वारा मांडलेल्या कैफियतीमुळे काही काळ गाजत राहिले, याचीही नोंद करणे आवश्यक आहे.) शास्त्रीय मराठी व्याकरणाच्या संपादनकार्यात शिरल्यानंतर केवळ या पुस्तकापुरते लिहून भागणार नाही, तर संपूर्ण मराठी व्याकरणविषयक पुस्तकांचा परामर्श घेतला पाहिजे या जाणिवेने अर्जुनवाडकर प्रयत्नशील राहिले. या प्रयत्नाचेच फळ म्हणून त्यांच्या हातून 'मराठी व्याकरणः वाद आणि प्रवाद' आणि 'मराठी व्याकरणाचा इतिहास' ही पुस्तके लिहून झाली. या पुस्तकांच्या रूपाने मराठी व्याकरणाच्या क्षेत्रात संस्मरणीय कार्य त्यांच्या हातून घडले यात शंका नाही. या ग्रंथलेखनाखेरीज व्याकरणविषयक बरेच स्फुट लेखनही त्यांनी केले आहे. लेखन ग्रंथरूप असो किंवा लेखरूप असो, अर्जुनवाडकरांच्या शैलीचे जे विशेष त्यांच्या प्रारंभीच्या लेखनात दिसतात तेच अलीकडच्या लेखनातही दिसतात. हे सातत्यही त्यांनी टिकवले आहे. साहित्य महामंडळाचे शुद्धलेखनाचे नियम प्रसिद्ध होण्याच्या सुमारास त्यांनी लिहिलेले लेख; व्याकरणकार दामल्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने लिहिलेला 'कर्तरि दामले आणि कर्मणि दामले' हा लेख; 'संयुक्त क्रियापद' या कल्पनेलाच विरोध करणारा त्यांचा लेख आणि 'अस्मिता महाराष्ट्राची' या संपादित ग्रंथासाठी लिहिलेला मराठी व्याकरणाचा आढावा घेणारा लेख अशा त्यांच्या अनेक लेखांचा उल्लेख करता येईल. तंजावरच्या सरस्वती महाल या ग्रंथालयात मिळालेल्या 'महाराष्ट्र प्रयोगचंद्रिका' या मराठीच्या संस्कृतमधील व्याकरणपुस्तकाचे संपादनही त्यांनी कसोशीने केले आहे. एका विशिष्ट क्षेत्रातच वर्षानुवर्षे लेखनकार्य करीत राहणारे व्यासंगी अभ्यासक

मराठीत तरी फार मोजके आढळतात. मराठी व्याकरण या विषयापुरते बोलायचे झाल्यास अर्जुनवाडकरांना काय म्हणायचे आहे ते विचारात घेतल्याशिवाय यापुढील अभ्यासकांना वाटचाल करता येणार नाही. सत्याचा शोध घेण्यासाठी वाटेल तेवढे परिश्रम करण्याची तयारी, कोणतेही विधान निराधारपणे करायचे नाही ही शिस्त, तपशिलातही चूक घडू द्यायची नाही अशी दक्षता आणि शास्त्रचर्चेत कोणाचीही भीडभाड बाळगायची नाही हा बाणा, हे मराठी अभ्यासकांत क्वचितच आढळणारे गुण अर्जुनवाडकरांच्या लेखनात प्रकर्षाने जाणवतात, हेही मान्य करावे लागेल. वाद घालण्याची हौस, वक्तृत्वपूर्ण विवेचन-पद्धती आणि याआधी उल्लेखलेला खोचकपणा यांच्या समुच्चयामुळे त्यांचे लेखन रंजक बनते हेही तितकेच खरे.

### अंतर्बाह्य वेधक पुस्तक

मराठी व्याकरणाचा इतिहास हे अर्जुनवाडकरांचे नवे पुस्तक त्याच्या बाह्यांगापासूनच वाचकांचे लक्ष वेधून घेते. त्यांच्या आधीच्या दोन पुस्तकांप्रमाणेच अभ्यासकांची जास्तीत जास्त सोय कशी पाहता येईल आणि मुद्रणाचा विविध प्रकारे सदुपयोग कसा करता येईल, इकडे अर्जुनवाडकरांनी सतत लक्ष पुरविले आहे. वेगवेगळ्या चिन्हांचा उपयोग करणे, मूळ मजकुरातच संदर्भही देणे, सरळ, तिरप्या, जाड, बारीक अशा अक्षरमुद्रांचा सहेतुक वापर करणे, वर्ण्य विषयासंबंधी मूळ ग्रंथकाराकडून झालेल्या शब्दयोजनेच्या चुका दाखवणे, अशा प्रत्येक बाबतीत या ग्रंथात काटेकोरपणा दिसून येतो. अर्जुनवाडकरांनी मुद्रणाच्या आधुनिक पद्धतींचाही चांगला परिचय करून घेतला असल्यामुळे पुस्तकाच्या केवळ बाह्य रूपामुळेसुद्धा वाचकाचा त्याबद्दल अनुकूल ग्रह होतो. अर्थात पुस्तकाचे अंतरंग कसदार असेल तरच ही बाह्य सजावट शोभादायक ठरते. मूळ संस्कृत अध्ययनाचा पाया, अंगी बाणलेली शास्त्रनिष्ठा आणि मराठी भाषेतही शास्त्रशुद्ध ज्ञानोपासना वाढीस लागली पाहिजे ही आस्था, हे सर्व जमून आल्यामुळे अर्जुनवाडकरांचे हे पुस्तक अंतर्बाह्य वेधक आणि परिणामकारक झाले आहे, हे मान्य केले पाहिजे. एकाच विषयाचा वीस-पंचवीस वर्षे पाठपुरावा करून मगच तो अभ्यास पुस्तकरूपाने अभ्यासकांपुढे ठेवण्याची परिश्रमशीलता आणि दीर्घोद्योग हे गुण आताच्या काळात क्वचितच आढळतात. योगायोगाने का होईना, अर्जुनवाडकर मराठीच्या अभ्यासाकडे वळले, हे मराठीच्या अभ्यासकांना उपकारकच झाले. मुळात न्यायशास्त्राचे व्यासंगी असून 'शास्त्रीय मराठी व्याकरणा'च्या रूपाने मोरो केशव दामले यांनी विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात महनीय कार्य केले. त्याच प्रकारची कामगिरी 'मराठी व्याकरणाचा इतिहास' लिहून अर्जुनवाडकरांनी विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात बजावली, हेही मोकळेपणाने मान्य केले पाहिजे.

### मराठीच्या व्याकरणाचा इतिहास

या पुस्तकाची पहिली पंधरा प्रकरणे विविध प्रकारच्या लहान-मोठ्या १०९ व्याकरणकृतींचा परामर्ष घेणारी असून सोळाव्या उपसंहाराच्या प्रकरणात अर्जुनवाडकरांनी मराठी व्याकरणाच्या वाटचालीबद्दल स्वतःची भूमिका व निष्कर्ष यांची एकत्रितपणे नोंद केली आहे. 'मराठी व्याकरणाचा इतिहास' यातील मराठी व्याकरण हा शब्दप्रयोग दोन अर्थांनी घेतलेला दिसतो. एक म्हणजे मराठी भाषेत व्याकरणविषयक झालेले लेखन हा अर्थ आणि मराठी भाषेचे अन्य भाषांतून लिहिले गेलेले व्याकरण हा दुसरा अर्थ. व्याकरण ही संज्ञासुद्धा येथे निदान शीर्षकाच्या बाबतीत तरी व्यापक अर्थाने वापरली गेली आहे. व्याकरण या संकल्पनेच्या चौकटीत जे जे विषय येतात त्यांची लेखरूपाने चर्चा झाली असल्यास अशा पुस्तकांचाही समावेश अर्जुनवाडकरांनी केला आहे. त्यामुळे प्रारंभापासून आजपर्यंत ज्यांनी ज्यांनी मराठीचे व्याकरण सांगितले अशा व्याकरणपुस्तकांचा मागोवा घेणारा असा हा ग्रंथ आहेच,पण ज्यांनी व्याकरणचर्चेत काही ना काही भर घातली अशांच्या मतांचा परामर्षही येथे पाहावयास मिळतो. खरे म्हणजे 'मराठी व्याकरणपुस्तकांचा व व्याकरणविषयक लेखनाचा इतिहास' असे या पुस्तकाचे स्वरूप आहे. पण पुस्तकाचे नाव 'मराठी व्याकरणाचा इतिहास' असे सुटसुटीत असणे योग्यच म्हटले पाहिजे. मात्र मंगरूळकरांनी आपल्या पुस्तकाला 'मराठीच्या व्याकरणाचा पुनर्विचार' असे म्हटले. त्याप्रमाणे 'मराठीच्या व्याकरणाचा इतिहास' असे या पुस्तकाचे नामकरण व्हावयास पाहिजे होते. पुस्तकाचे नाव असे असले काय आणि तसे असले काय,त्याने काय फरक पडतो असे कुणी म्हणेल. 'नावात काय आहे ?' या प्रश्नाचा हवाला देता येतोच. पण हा तडजोडीचा मार्ग झाला. अर्थात या पुस्तकाच्या नामकरणामागे अर्जुनवाडकरांनी काही विचार केला असणारच,पण त्याचे स्पष्टीकरण मात्र कोठे आढळत नाही.

### मराठी व्याकरणाचा विकासक्रम

महानुभावांच्या काळापासून म्हणजेच पंडित भीष्माचार्यांच्या पंचवार्त्तिकापासून मराठी व्याकरणाचा प्रारंभ सांगता येत असला आणि सतराव्या शतकातील फादर स्टिफन्सनच्या नावावरही काही व्याकरणविषयक लेखन दिसत असले, तरी मराठीत विल्यम केरीपासून खऱ्या अर्थाने व्याकरणकारांची परंपरा सुरू होते. रूढ समजुतीप्रमाणे दादोबा पांडुरंग हे मराठीचे पहिले व्याकरणकार. पण अर्जुनवाडकरांनी दाखवून दिल्याप्रमाणे १८३६ मध्ये प्रसिद्ध झालेले दादोबांचे महाराष्ट्रभाषेचे व्याकरण प्रसिद्ध होण्याआधी वेगवेगळ्या प्रकारची लहान-मोठी अकरा पुस्तके लिहिली गेली होती. (त्यांतली देवनागरीत मुद्रणाचा संस्कार होऊन वाचकांपुढे आलेली किती व कोणती हा भाग वेगळा.) दादोबापूर्व व्याकरणाची जी माहिती आपल्यापुढे येते ती बरीच उद्‌बोधक आहे. अ. का. प्रियोळकर,

कृ. भि. कुलकर्णी अशा काही अभ्यासकांमुळे दादोबापूर्व अशाच्या काहा व्याकरणकृतींचा ओळख वाचकांना झाली होती; पण अर्जुनवाडकरांनी या बाबतीत दाखवलेला साक्षेप महत्त्वाचा आहे. मराठी व्याकरणविषयक लेखनाचा विकास कसकसा होत गेला, हे अर्जुनवाडकरांनी योजलेल्या प्रकरणांच्या शीर्षकावरूनसुद्धा लक्षात येते. पाऊलवाटा, राजमार्ग, शास्त्रीय मंथन, ऐतिहासिक रीती, अनुकरण, व्याकरण हा आरसा, अवशिष्ट व्याकरणकार, ऊहापोहांचा आखाडा, सवतासुभा, समस्यांचा शोध ही शीर्षके अतिशय समर्पक आणि त्या त्या व्यक्तीचे, कालखंडाचे किंवा प्रवृत्तीचे यथायोग्य दर्शन घडविणारी आहेत. ('अवशिष्ट' व्याकरणकार यातला 'अव' हा उपसर्ग मात्र तुच्छतादर्शक वाटल्याशिवाय राहत नाही.) व्याकरणप्रवेशिका आणि भाषाप्रवेशिका या प्रकरणांमुळे लहान-मोठ्या सर्वांच्याच व्याकरणविषयक लेखनाला स्थान मिळाल्यामुळे या ग्रंथाला समावेशकता प्राप्त झाली आहे.

**महत्त्वाचे आणि गौण व्याकरणकार**

या पुस्तकात ज्या लहान-मोठ्या व्याकरण पुस्तकांचा परामर्श अर्जुनवाडकरांनी घेतला आहे, त्यांतली सर्वच पुस्तके सारख्या योग्यतेची आहेत, असे अर्थातच नाही. पण तरीही अनुल्लेखाने कोणावर अन्याय व्हायला नको, या हेतूने थोडक्यात का होईना, पण प्रत्येक पुस्तकाकडे अर्जुनवाडकरांनी लक्ष पुरविले आहे. मराठी व्याकरणपरंपरेत ज्यांना विशेष महत्त्वाचे स्थान आहे, अशा पुस्तकांबद्दल त्यांनी विस्ताराने लिहिले, हेही पटणारेच आहे. प्रत्येक पुस्तकाच्या बाबतीत प्रथमतः त्या पुस्तकाचा मुख्य आशय संक्षेपाने सांगण्याचे धोरण त्यांनी अवलंबिले आहे. संबंधित पुस्तकाचे (अर्थात त्या व्याकरणकाराचे) जे श्रेय असेल ते त्याला देण्याचा प्रांजलपणाही त्यांनी दाखवला आहे. व्यक्ती लहान असो की मोठी, तिच्या लेखनातील अशास्त्रीयता, त्यामुळे घडलेल्या चुका आणि पडलेल्या मर्यादा यांवर अर्जुनवाडकरांनी कडक टीका करावी, यातही अयोग्य असे काही नाही. टीका करताना रा. भि. जोशी, म. पां. सबनीस आणि ग. ह. केळकर यांच्या बाबतीत ती अधिक धारदार झाली आहे. याउलट 'स्वरव्यंजन व्यवस्था'कार पांडुरंग जनार्दन पाध्ये, गो. कृ. मोडक आणि प्रा. मंगरूळकर यांचे दोष काहीशा सौम्यपणाने त्यांनी दाखवले आहेत. पण असे डावे-उजवे चालायचेच. दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर, रा. भि. गुंजीकर, मोरो केशव दामले आणि इतिहासाचार्य राजवाडे या सर्वांचे मराठी व्याकरणाच्या संदर्भातले कार्य सर्वाधिक महत्त्वाचे आहे. त्यांचे दोष दाखविण्यात अर्जुनवाडकरांनी कुचराई केलेली नाही. पण तुलनेने या लेखकांच्या वाट्याला प्रशंसा अधिक आली आहे. (केवळ या कारणामुळेही या व्याकरणकारांना मोठे म्हणावे लागेल.) आजच्या मराठी व्याकरणाच्या अभ्यासकांपुढे अर्जुनवाडकरांनी निर्देशिलेली सर्वच पुस्तके असणे संभवत नाही. जिथे दादोबा पांडुरंगांचे

व्याकरण आज दुर्मिळ झाले आहे, तेथे इतर अनेक पुस्तकांचा कधी संबंधही आला नसणे स्वाभाविक ठरते. पण समग्र इतिहासलेखनाची योजना पार पाडणाऱ्याला अमूक एक पुस्तक दुर्मिळ आहे, अशी सबब पुढे करता येत नाही. त्यामुळेच या ग्रंथाच्या सिद्धीमागे अर्जुनवाडकरांचे श्रम किती अफाट आहेत याची कल्पना या क्षेत्राचा थोडाबहुत परिचय असलेल्यांना नक्कीच येईल. विल्यम केरी, स्टीव्हन्सन, वर्जिस, नवलकर, खेर, गंगाधरशास्त्री फडके, कृष्णशास्त्री गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे, गंगाधर- शास्त्री टिळक इत्यादी व्याकरणकारांची नावे विद्यापीठाच्या अभ्यासक्रमामुळे संबंधितांच्या थोडीफार परिचयाची असतात. पण त्यांच्या कार्याचे नेमके स्वरूप काय, महत्त्व काय, त्यांच्या मर्यादा कोणत्या, आणि मराठी व्याकरणाच्या इतिहासात त्यांचे स्थान काय, याची यथायोग्य कल्पना या पुस्तकामुळे नवीन अभ्यासकांना निश्चितच येईल. (लेखकाने उल्लेखिलेल्या मूळ पुस्तकांचा शोध घ्यावा, लेखकांच्या विधानांचा खरेखोटेपणा पडताळून पाहावा, त्यावरच आपले मत बनवावे ही अपेक्षा वस्तुतः वेगवेगळ्या व्याकरणकारांच्या उल्लेखामागे असते. पण आजच्या आपल्या शिक्षणाची परवड आणि परीक्षार्थींची– इतकेच कशाला, प्राध्यापकांची– मनोवृत्ती लक्षात घेतली, तर या पुस्तकाच्या रूपाने अर्जुनवाडकरांनी सगळ्यांपुढे आयतेच ताट वाढून ठेवले आहे, असे वाटत राहते. तेव्हा या पुस्तकातलाच मजकूर उद्‌धृत करून मराठी व्याकरणाचा महाविद्यालयीन आणि विद्यापीठीय पातळीवरील विद्यार्थी, परीक्षकांना 'तयार उत्तरे' देत राहील आणि परीक्षकांनाही ती अमान्य करता येणार नाहीत, याची खात्री– आणि काळजी– वाटत राहते. नाही म्हणायला मराठीवरच्या इंग्रजी, हिंदी आणि रशियन इत्यादी भाषांमधील व्याकरणाचा परामर्श अर्जुनवाडकरांनी थोडक्यात घेतला आहे. त्या दिशेने अधिक काही करायला वाव आहे.)

### आधीच्या अभ्यासकांचे श्रेय

अर्जुनवाडकरांच्या या पुस्तकाचे सर्वांगीण मोठेपण निःसंकोचपणे मान्य करताना असमाधानाच्या ज्या जागा आहेत, त्या सांगितल्याच पाहिजेत. या पुस्तकात घेतला आहे तसा ऐतिहासिक आढावा अर्जुनवाडकरांनी यापूर्वीही दोन वेळा घेतला आहे. 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद' या त्यांच्या पुस्तकाची बरीच पाने या विषयासाठीच खर्ची पडली आहेत. त्याचप्रमाणे 'अस्मिता महाराष्ट्राची' या संपादित ग्रंथात 'मराठी व्याकरणाची पंचवीस वर्षे' या लेखातही अर्जुनवाडकरांनी मराठी व्याकरणाच्या इतिहासाचेच कथन केले आहे. या लेखात तर शीर्षकातच काय ती 'पंचवीस वर्षे' आढळतात. प्रत्यक्षात एकशे साठ वर्षांचा मराठी व्याकरणाचा इतिहासच त्यांना अभिप्रेत आहे. आपण स्वतःच यापूर्वी इतिहासलेखन केलेले असूनही आता नव्यानेच ते पुन्हा करण्यामागे काय हेतू आहे, आपले यापूर्वीचे निष्कर्ष टिकून आहेत का, हे त्यांनी सांगावयास हवे होते. मराठी व्याकरणाचा

इतिहास सांगण्याचा प्रयत्न अर्जुनवाडकरांनीच काय तो प्रथम केला, असे नक्कीच म्हणता येत नाही. मराठी व्याकरणाची कूळकथा (अ. का. प्रियोळकर), आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती (कृ. भि. कुलकर्णी) यांची पुस्तके तर प्रसिद्धच आहेत, याशिवाय अर्वाचीन काळातील मराठी वाङ्मयेतिहासाच्या अनेक पुस्तकांत त्या त्या वेळच्या मराठी व्याकरणकारांच्या कार्याकडे लक्ष पुरवण्यात आलेले दिसते. हे संदर्भ अर्जुनवाडकरांनी पाहिले आहेत किंवा नाहीत याचा उलगडा होत नाही. ग. ह. केळकरांच्या 'मराठी व्याकरणाची मूलतत्त्वे' या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीत समाविष्ट केलेल्या डॉ. सु. बा. कुलकर्णी यांच्या 'मराठी व्याकरणाचा इतिहास' सांगणाऱ्या लेखाची योग्यता वस्तुतः कितीतरी मोठी आहे. पण या लेखाचे श्रेय अर्जुनवाडकर हात राखूनच मान्य करीत आहेत, असे ज़ाणवत राहते. जणू काही टाकाऊ पुस्तकाची उपयुक्त पुरवणी, एवढेच सु. बा. कुलकर्णी यांच्या लेखाचे मोल ! ज्या विषयासंबंधी आपणास नव्याने काही सांगायचे आहे, त्याबद्दल आधीच्या काळात कोणी, काय काम केले आहे, त्याची योग्यायोग्यता कोणती हे लेखकाने सांगावे, अशी अपेक्षा असते. अनेक जण ही रीत पाळतातही. पण अर्जुनवाडकरांनी मात्र ज्याचे श्रेय त्याला देण्याच्या बाबतीत हात आखडता घ्यावा, हे योग्य वाटत नाही.

### मराठी व्याकरणकारांचे प्रमुख दोष

व्याकरण हे शास्त्र आहे, त्यामुळे शास्त्राच्या ज्या कसोट्या आहेत त्यांनुसारच व्याकरणकारांनी भाषेचे व्याकरण सांगितले पाहिजे, यावर अर्जुनवाडकरांचा कटाक्ष आहे. आणि तो रास्तही आहे. व्याकरणबाह्य अशा इतर क्षेत्रांच्या अनुरोधाने व्याकरणात काही आणू नये, हेही मान्य केले पाहिजे. व्याकरणाचे प्रयोजन काय, व्याकरणाची प्रमाणे कोणती, आणि मुख्य म्हणजे व्याकरणाची कक्षा किंवा व्याप्ती कोणती, यांबद्दलही काटेकोरपणे विचार केला पाहिजे आणि त्याचे पालन केले पाहिजे, असाही त्यांचा सर्वत्र आग्रह आहे. मराठी व्याकरणकारांना मुळात शास्त्रदृष्टी नाही, ज्यांना आहे त्यांची ती फार काळ टिकत नाही, अशी अर्जुनवाडकरांची मुख्य तक्रार आहे. व्यवहाराच्या नावाखाली तडजोड करण्याकडे म्हणजेच शास्त्रीयतेपासून दूर जाण्याकडे मराठी व्याकरणकारांची प्रवृत्ती असते, मराठीचे व्याकरण सांगताना इतर भाषांत काय आहे, त्या अनुरोधानेही विचार मांडला जातो, त्यामुळे काही तुरळक व्याकरणकारांचा अपवाद सोडल्यास मराठी व्याकरणाची परंपरा ही अथपासून दोषांनी डागाळलेली आहे, असा एकंदरीने अर्जुनवाडकरांचा अभिप्राय आहे.

### मराठी व्याकरणकार आणि शास्त्रदृष्टी

मुळात अर्जुनवाडकर संस्कृत भाषेचे अभ्यासक असल्यामुळे संस्कृत व्याकरणशास्त्र



अनुक्रमणिका

त्याच्या परिभाषेसकट त्यांना अवगत असल्यामुळे त्या तोडीचे व्याकरणशास्त्र मराठीत अजून सिद्ध झाले नाही, याबद्दलचे त्यांचे असमाधान समजण्यासारखे आहे. मात्र शास्त्र नावाची गोष्ट एकदा ठरून गेली की गेली, तिच्यात कानामात्रेचाही बदल चालणार नाही, या प्रकारचा अर्जुनवाडकरांचा आग्रह संस्कृतच्या बाबतीत ठीक आहे. पण मराठीसारखी जी भाषा नित्य बदलण्याच्या अवस्थेत असते, तिच्या बाबतीतील काढलेले निष्कर्ष कालांतराने अपुरे किंवा चुकीचेही ठरू शकतात. भाषेत सूक्ष्मपणे का होईना पण बदल होत असतो, आणि एक-दोन पिढ्यांच्या अंतराने हा बदल जाणवल्याशिवाय राहत नाही. (अर्जुनवाडकरांनी १५०-१७५ वर्षांपूर्वी मराठी भाषा जशी बोलली जात होती, तशीच ती आजही बोलली जाते, असे एके ठिकाणी [पृ. २७८] म्हटले आहे, त्यांचे म्हणणे अवास्तव आहे. हे अनेक उदाहरणे देऊन दाखवता येईल.) शास्त्र ही संकल्पना भाषानिरपेक्ष आहे ही गोष्ट खरी. सर्व शास्त्रांचे जे मूळ तर्कशास्त्र, त्यातील सिद्धांतांना अनुसरूनच सर्व शास्त्रांनी वागायचे असते हेही अमान्य करता येत नाही. पण शास्त्राशास्त्रांमध्येही फरक असतो, हे आज तरी कोणी अमान्य करीत नाही. भौतिक शास्त्रांचे निकष सामाजिक शास्त्रांना लागू पडत नाहीत. भाषा आणि व्याकरण यांचा समावेश सामाजिक शास्त्रांतर्गतच होतो. त्यामुळेच 'शास्त्र' संकल्पनेतला दृढपणा, अपरिवर्तनीयता, निरपवादित्व यांचा व्याकरणाच्या बाबतीत तारतम्यानेच विचार करावा लागतो. व्याकरण ही एक काल्पनिक गोष्ट असती, तर भाषानिरपेक्ष असे व्याकरण रचता आले असते, पण भाषेहून व्याकरण वेगळे करता येत नाही आणि भाषा ही तर जिवंत, गतिशील, समाजसापेक्ष तशीच व्यक्तिसापेक्ष, लवचिक आणि प्रवाही आणि त्यातही यादृच्छिक संकेतांवर अवलंबून असलेली अशी गोष्ट असल्यामुळे बोलण्यातल्या भाषेचे कायमचे असे व्याकरण असू शकत नाही, हे कोणालाही मान्य होण्यासारखे आहे. स्वतः अर्जुनवाडकरांनी कृष्णशास्त्री चिपळूणकर आणि रा. भि. गुंजीकर यांचा अनेकदा उल्लेख करून 'भाषेत गोंधळ नाही, गोंधळ व्याकरणकारांच्या मनात आहे. तेव्हा व्याकरणकारांनी बदलले पाहिजे,' असे म्हटले आहे. त्यावरून भाषेतील बदलानुसार व्याकरणातील निष्कर्ष बदलत असतात, हे सूचित केले आहे. अर्जुनवाडकरांना अपेक्षित अशी शास्त्रदृष्टी मराठी व्याकरणकारांजवळ नाही, हे एक वेळ मान्य करता येईल. जटिल आणि गुंतागुंतीच्या गोष्टी टाळण्याकडे त्यांची प्रवृत्ती असते, असेही म्हणता येईल. पण केवळ स्वैरपणाने मनमानी पद्धतीने शास्त्राची मूलतत्त्वे गुंडाळून ठेवून व्याकरणाच्या नावाखाली काहीतरी भोंगळ मजकूर लिहिण्यात आजवरचे व्याकरणकार खर्ची पडले आहेत, असे म्हणणेही अन्यायाचे होईल. मराठीची वर्णमाला कोणती? संयुक्त स्वर मानावेत की न मानावेत? क्ष, ज्ञ, ही स्वतंत्र व्यंजने आहेत का? केवळ मराठी संधी कोणते? शब्दांच्या जाती किती व कोणत्या? शब्दांचे वर्गीकरण कसे केले पाहिजे? विकारी व अविकारी ही विभागणी पुरेशी आहे का? विभक्ती किती व कोणत्या

मानाव्यात? विभक्तीचे विभक्तीपण ठरवणारे निकष कोणते? द्वितीया गाळावी की ठेवावी? षष्ठी ही विशेषण- विभक्ती आहे की कारक विभक्ती? मराठीत आख्याने किती व कोणती आहेत? त्यांची व्यवस्था कशी लावावी? संयुक्त काळ, संयुक्त क्रियापदे इत्यादी ग्राह्य की त्याज्य? व्याकरणात वाक्यविचार येतो किंवा नाही? असे एक ना दोन, शेकडो प्रश्न मराठी व्याकरणकारांनी उपस्थित केले आहेत. आणि ठिकठिकाणी आपले मतभेद नोंदवले आहेत. हे असे का, असा प्रश्न पडणे, त्याचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न करणे, आपल्या मताला अनुसरून प्रमाणे शोधणे, दुसऱ्याचे म्हणणे युक्तिवादपूर्वक व साधार खोडून काढणे, हे सर्व शास्त्रात मोडते किंवा नाही? अविश्वास किंवा अश्रद्धा यांचे महत्त्व शास्त्राच्या बाबतीत फार असते, असे अर्जुनवाडकर म्हणतात, ते बरोबरच आहे. मग मराठी व्याकरण ग्रंथात उपस्थित होणारे शेकडो प्रश्न केवळ अज्ञानजन्य आणि भाबडे आहेत म्हणून त्यांची वासलात लावायची की ज्ञानलालसेपोटी ते उद्‌भवले आहेत, असे मानायचे, हे एकदा निश्चित केले पाहिजे.

### तडजोड

मराठी व्याकरणकार तडजोड करायला तयार असतात त्यामुळे शास्त्रीयतेला धक्का पोचतो, हा अर्जुनवाडकरांचा मुख्य आक्षेप आहे. पण तडजोड करण्यात केवळ पळ काढण्याची वृत्ती आहे, की गत्यंतर नाही म्हणून तडजोड केली जाते, हेही ठरवले पाहिजे. एवढे शास्त्राच्या नियमांबद्दल काटेकोर व आग्रही असलेले अर्जुनवाडकर, पण त्यांनी तडजोड केल्याची अनेक उदाहरणे दाखवता येतील. कधी लाघव हे कारण त्यांनी दिले आहे (वाद-प्रवाद पृ. ९१). कधी वारसा हे कारण पुढे केले आहे (वाद-प्रवाद पृ. ८२). अनुवर्णांचा (Allophones) वर्णमालेत समावेश करता येणार नाही, असे त्यांनी एका ठिकाणी म्हटले आहे (पृष्ठे ३७४). वस्तुतः अनुवर्ण किंवा स्वनांतर ही संकल्पना स्वीकारणारा कोणीही असला उद्योग करणार नाही. तेव्हा इतरांना धारेवर धरत अनेकदा अर्जुनवाडकरही शास्त्रदृष्ट्या प्रामादिक असे काही करू लागतात. त्याचे आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाही.

### वाद-प्रवादाची दखल

या पुस्तकाचा उपसंहार म्हणून जे प्रकरण अर्जुनवाडकरांनी लिहिले आहे, ते त्यांच्या 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद' या आधीच्या पुस्तकावरच आधारलेले आहे. त्या पुस्तकाची दखल मराठी अभ्यासकांनी घ्यावी तशी घेतली नाही, अशी अर्जुनवाडकरांची तक्रार आहे. अनेक ठिकाणी विस्तृत परीक्षणे यावीत, असे लेखकांस नेहमीच वाटत असते. बहुदा वैचारिक पुस्तकांच्या बाबतीत मराठीत अल्प प्रमाणातच अशी परीक्षणे आढळतात. पण मराठी अभ्यासकांना 'इतका प्रथिनयुक्त आहार पचवता येत नाही', अशी जी समजूत

अर्जुनवाडकरांनी करून घेतली आहे, ती योग्य नाही. अर्जुनवाडकरांच्या आणि मुंबई विद्यापीठातील मराठी विभागाच्या पुढाकाराने 'वाद-प्रवाद' या पुस्तकाच्या निमित्ताने सात दिवसांचे एक चर्चा-शिबिर घेण्यात आले होते. त्या निमित्ताने परीक्षणात्मक निबंध लिहिले गेले आणि अर्जुनवाडकरांनी उपस्थित केलेल्या विविध प्रश्नांची सविस्तर चर्चा झाली. अर्जुनवाडकरांच्या भूमिकेला सप्रमाण विरोध करणारी अनेकांची भाषणेही या सात दिवसांत झाली. मुख्य म्हणजे साठ-सत्तरपेक्षा अधिक संख्येने व्याकरणाचे जिज्ञासू अभ्यासक या संपूर्ण चर्चाशिबिरात सहभागी झाले. तेव्हा खरे म्हणजे अशा प्रकारच्या इतर पुस्तकांच्या तुलनेने अर्जुनवाडकरांच्या कार्याची चांगली दखल अनेकांनी घेतली, असेच म्हटले पाहिजे.

### अर्जुनवाडकरांचे निष्कर्ष

मराठी व्याकरणासंबंधी अर्जुनवाडकरांची मते त्यांनी संपादित केलेल्या दामल्यांच्या व्याकरणापासून बनून गेलेली दिसतात. त्यांच्या मते वर्णविचार हा व्याकरणाच्या कक्षेच्या बाहेरचा विषय आहे. कारण वर्ण किंवा ध्वनी यांना अर्थ नसतो. त्यामुळे सार्थ अशा शब्दविचारापासूनच व्याकरणाची कक्षा सुरू होते. शब्दनिरपेक्ष किंवा भाषानिरपेक्ष ध्वनी हा निरर्थक असतो हे मान्य केले, तरी ध्वनी किंवा वर्ण हे भाषेचे मूलद्रव्य होय. त्यामुळे या मूलद्रव्याला डावलून चालणार नाही. आधुनिक भाषाविज्ञानाच्या स्वनविचारानुसार अर्थदृष्ट्या दोन शब्दांमधील फरक हा उच्चारणावरच अवलंबून असतो. मराठी व्याकरणकारांनी संस्कृतमधील संधीविचार मराठीत जसाच्या तसा आणला, ही अर्जुनवाडकरांची तक्रार रास्त असली तरी मराठीतही संधी हे प्रकरण आहेच. संस्कृत पद्धतीने संधी होणे हा प्रकारही मराठीत घडतो. तसा संस्कृतदृष्ट्या अमान्य असा संधीही मराठीत घडतो. (उदा. मनः कामनाच्या ऐवजी 'मनोकामना', निष्पक्षपातीपणा याऐवजी 'निः पक्षपातीपणा,' हाहाकारच्या ऐवजी 'हाहाः कार' इत्यादी). स्वनिक परिसरावर आणि त्या त्या भाषकांच्या इच्छेवर हे संधीप्रकरण अवलंबून असते. शब्दांचे वर्गीकरण, नामिक शब्दांचे विकरण हे व्याकरणातले घटक नेहमीच विवाद्य ठरले आहेत. मराठीत एकूण पाच विभक्ती मानाव्यात, असे अर्जुनवाडकरांना वाटते (पृ.३८१). पण या बाबतीतही मतभेदाला भरपूर वाव आहे. 'संयुक्त क्रियापद' याबाबत तर अर्जुनवाडकर अवास्तव भूमिका आग्रहाने मांडत आहेत, असेच म्हटले पाहिजे. एकंदरीने व्याकरणाची म्हणून जी प्रमुख अंगे आहेत त्यांत अर्जुनवाडकर काही ना काही वेगळे सांगू पाहतात. मात्र त्यांचे म्हणणे पटणार नाही (व टिकणार नाही) अशीही बरीच स्थळे दाखविता येतील. मराठीतील महाप्राण व्यंजनांची चर्चा करण्याच्या निमित्ताने 'य' युक्त संयुक्त व्यंजनांबद्दल अर्जुनवाडकरांनी जे काही म्हटले आहे ते प्रस्तुत विषय सोडून वितंडवादाचा मार्ग ते कसा स्वीकारतात याचे उत्तम उदाहरण होय.



अनुक्रमणिका






**भाषाविज्ञान आणि अर्जुनवाडकर**

गेल्या ४०-५० वर्षांपासून भारतात ज्याचा पद्धतशीर अभ्यास सुरू झाला आणि काही काळाने ज्याचा विद्यापीठीय अभ्यासक्रमात समावेश झाला, त्या आधुनिक भाषाविज्ञानाबद्दल अर्जुनवाडकरांचे मत चांगले नाही असे दिसते. केवळ पाश्चात्यांच्या तोंडाकडे पहावयाचे आणि ते म्हणतील ते प्रमाण मानून त्यांची उसनवारी करण्यात धन्यता मानावयाची, असली दुवळी वृत्ती आपल्या अभ्यासकांमध्ये आढळते, असा अर्जुनवाडकरांचा एकूण अभिप्राय आहे. आपली बुद्धी गहाण टाकणारी आणि केवळ अंधानुकरणात रमणारी परप्रत्ययनेय मनोवृत्ती केव्हाही त्याज्यच, यात शंका नाही. पण आधुनिक भाषावैज्ञानिक सरसकट या मनोवृत्तीचे आहेत, हा अर्जुनवाडकरांचा समज साफ चुकीचा म्हटला पाहिजे. वस्तुतः भारतात गेल्या दोन शतकांत जे प्रबोधन झाले आणि विविध ज्ञानशाखांमध्ये भारतीयांची जी काही प्रगती झाली, तिचा संबंध पाश्चात्यांच्या ज्ञानविज्ञानाशी झालेल्या परिचयात आहे, हे कुणीही विचारी माणूस नाकारणार नाही. अगदी प्राथमिक अवस्थेत भाबडी अनुकरणशीलता आढळते, नाही असे नाही. पण जी नवीन विचारप्रणाली आणि अभ्यासपद्धती प्रसृत झाली असेल तिचा स्वीकार डोळसपणाने, तारतम्याने आणि त्याचे बरेवाईटपण तपासून मगच केला पाहिजे, एवढा विवेक निदान भाषाविज्ञानाच्या बाबतीत भारतीय अभ्यासकांनी नक्कीच दाखवला आहे. व्याकरणाच्या आदेशात्मक पद्धतीपासून वर्णनात्मक पद्धतीकडे जुन्या पठडीतल्या व्याकरणकारांनाही वळावेसे वाटत आहे, हा भाषाविज्ञानाचाच परिणाम होय. मंगरूळकरांनी मराठीच्या व्याकरणाचा पुनर्विचार केला, त्यालाही हा आधुनिक दृष्टिकोण कारणीभूत झाला, असे निश्चितच म्हणता येईल. तसे पाहिले तर अर्जुनवाडकरांनीही विल्यम जोन्स, येस्पर्सन, ब्लूमफिल्ड आणि सपीर यांच्यासारख्या पाश्चात्त्य अभ्यासकांची मते उद्धृत केली आहेतच. एरवी भाषेचे स्वरूप, कार्य आणि तिचे व्यवस्थापन याबद्दल अतिशय मार्मिकपणे विचार करणारे अर्जुनवाडकर भाषाविज्ञानाला मात्र कमी का लेखतात, ते कळत नाही. वर्णनात्मक भाषाभ्यासाचा पाणिनी हा एक आदर्श आहे, हे कोणीच अमान्य करत नाही, पण संस्कृतसारख्या परिपूर्ण अवस्थेला पोहोचलेल्या भाषेच्या बाबतीत जे तत्त्व लागू होईल, ते घडणीच्या अवस्थेत असलेल्या वर्तमान भाषांना जसेच्या तसे लागू होईल, असे संभवत नाही. वस्तुतः हे अर्जुनवाडकरांनाही मान्यच आहे. कारण 'बाबा वाक्यं प्रमाणम्' याला त्यांचा विरोधच आहे. तेव्हा जुन्या पठडीतले सर्व सत्त्व पचवलेले अर्जुनवाडकरांसारखे अभ्यासक स्वागतशील वृत्तीने आधुनिक भाषाविज्ञानाकडे वळतील तर त्यात कोणा व्यक्तीचा काही लाभ होईल, यापेक्षा मराठी व्याकरणाच्या अभ्यासाला इष्ट दिशा मिळेल, असेच म्हटले पाहिजे.

### व्याकरणाचा अपुरा आलेख

मोठ्या परिश्रमाने मराठी व्याकरणाचा इतिहास अर्जुनवाडकरांनी सिद्ध केला आहे. तो पारंपरिक स्वरूपाच्या मराठी व्याकरणांचा चिकित्सक आलेख वाचकांपुढे ठेवणारा आहे यात शंका नाही. पण हा आलेख अपुरा आहे, असे मात्र म्हणावे लागते. तसे पाहिले तर 'साऊथ वर्थ' आणि नरेश कवडी यांच्या 'स्पोकन मराठी' या व यासारख्या पुस्तकांचा समावेश या पुस्तकात झाला आहे. पण गेल्या पंधरा-वीस वर्षांत आधुनिक भाषा-विज्ञानाच्या संदर्भात मराठीत जी अनेक पुस्तके निर्माण झाली आहेत त्याकडे मात्र अर्जुनवाडकरांनी दुर्लक्षच केले आहे. भाषाविज्ञानाच्या पुस्तकांचा व्याकरणाशी काय संबंध, असे म्हणायचे असेल तर ते योग्य ठरणार नाही. व्याकरण हे भाषाविज्ञानाहून वेगळे असू शकत नाही, तर भाषाभ्यासाच्या अनेक घटकांपैकी व्याकरण हा एक घटक असतो, असे भाषाविज्ञान मानते. मंगरूळकरांनी मराठीच्या व्याकरणाचा पुनर्विचार करताना भाषाविज्ञानाची भूमिका लक्षात घेतली होती म्हणूनच त्यांनी वास्तवतेचा निकष लावून वर्णमालेची पाहणी केली आणि अनुवर्णसारखी संज्ञाही वापरली. तेव्हा व्याकरणाचा इतिहास सांगताना मंगरूळकरांच्या पुस्तकाचा समावेश जसा आवश्यक ठरतो तोच प्रकार भाषाविज्ञानाच्या पुस्तकाबाबतीतही म्हटला पाहिजे. अशा पुस्तकात करण्यात आलेले मराठी भाषेचे वर्णन पटणारे आहे की न पटणारे हे प्रमाणे देऊन सांगणे वेगळे आणि अशा पुस्तकांचा अनुल्लेख करणे वेगळे. मराठी व्याकरणासंबंधी कृष्णशास्त्री चिपळूणकरांपासून ज्यांनी निबंध लिहिले आणि विविध प्रश्नांची चर्चा केली त्यांचा समावेश या पुस्तकात अर्जुनवाडकरांनी केला हे योग्य झाले. पण हाच न्याय डॉ. अशोक केळकर या आजच्या श्रेष्ठ भाषापंडिताच्या लेखनाला लावणे आवश्यक ठरते. डॉ. केळकरांच्या 'वैखरी' या लेखनसंग्रहात त्यांचे चिंतन उत्तम प्रकारे प्रकट झाले आहे. निदान 'मराठी व्याकरणाच्या नव्या दिशा' या लेखातील विचारांकडे अर्जुनवाडकरांनी लक्ष पुरवायला हवे होते. तसे त्यांनी न केल्यामुळे या पुस्तकात मोठीच उणीव राहून गेली आहे.

### अर्जुनवाडकरांचा 'पोलिओ सिद्धान्त'

पण आधुनिक मतप्रवाहाकडे डोळेझाक करणे एवढाच हा प्रकार आहे असे म्हणता येत नाही, तर एकूण मराठी व्याकरण पुस्तकांबद्दलच अर्जुनवाडकरांची भूमिका अनुदार आहे, असे म्हणावे लागते. मराठी व्याकरणकारांजवळ शास्त्रदृष्टी नाही, शास्त्राची शिस्त त्यांना माहीत नाही इत्यादी त्यांच्या आक्षेपांचा याआधी उल्लेख केला आहेच. अर्जुनवाडकरांचा मुख्य रोष एवढ्यासाठी की, मराठी व्याकरण जन्मतःच अधू आहे. ते स्वतःच्या पायावर अजूनही स्वतंत्रपणे उभे राहू शकत नाही. इंग्रजी आणि संस्कृत या दोन भाषांमधील व्याकरणकारांचे बोट धरल्याशिवाय मराठी व्याकरण पावले टाकू शकत नाही,



अनुक्रमणिका



इतके ते दुबळे आहे. या सगळ्या प्रकाराला अर्जुनवाडकरांचा 'पोलिओ सिद्धांत' असे म्हणता येईल. मराठी व्याकरण हे पोलिओग्रस्त दुबळे बालक आहे, हे मत १९७१ पासून म्हणजे जवळपास गेली २५ वर्षे अर्जुनवाडकर मांडत आले आहेत. 'अस्मिता महाराष्ट्राची' या पुस्तकातील 'मराठी व्याकरणाची पंचवीस वर्षे' हा त्यांचा १९७१ मधील लेख, 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद' हे त्यांचे १९८६ मधील पुस्तक आणि प्रस्तुतचा १९९२ मधे प्रसिद्ध झालेला ग्रंथ अशा सर्व ठिकाणी मराठी व्याकरणाकडे पाहण्याची अर्जुनवाडकरांची भूमिका 'पोलिओ सिद्धांत' म्हणूनच सांगावी लागते. प्रश्न असा पडतो की, मराठी व्याकरण जन्मतःच इतके दुबळे आणि केविलवाणे आहे, तर एवढा मोठा ग्रंथ लिहून या रुग्णाचे चरित्र अर्जुनवाडकर कशाला सांगत बसले आहेत? मराठीसारख्या वर्तमान भाषेला कुणी हिणवले काय किंवा तिचे अवास्तव कौतुक केले काय, त्याने काहीच साध्य होत नाही. पाणिनीच्या आधी संस्कृत व्याकरणाची अनेक शतकांची परंपरा होती. ती पचवलेली असल्याने पाणिनीच्या अष्टाध्यायीला मानदंडाची प्रतिष्ठा प्राप्त झाली आणि पतंजलीसारखे श्रेष्ठ भाष्यकार मिळाले म्हणून संस्कृतमधे 'व्याकरणमहाभाष्य' सिद्ध झाले. मराठीमध्ये जी साहित्य परंपरा आहे ती केवळ सहा-सात शतकांची म्हणजे अगदी मर्यादित. त्यातही इसवी सनाच्या दहाव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंत म्हणजे मध्ययुगात ज्या वर्तमान भारतीय भाषा घडत गेल्या त्यांपैकी कोणाच्याही बाबतीत शास्त्रग्रंथांची तशी परंपरा नव्हती. त्यात पुन्हा मध्ययुग हे सत्तासंघर्षाने, अस्थिरतेने आणि अस्मानी-सुलतानी संकटांनी व्यापलेले आहे. या काळात संस्कृत शास्त्रग्रंथांची परंपराही क्षीण झाली असे दिसून येते. मग नव्याने जन्माला आलेल्या वर्तमान भाषांमध्ये ती रुजली नाही, याचा उपहास करून काय साध्य होणार? त्यात पुन्हा सोळाव्या-सतराव्या शतकापासून इंग्रजी-फ्रेंच-पोर्तुगीज या युरोपीय भाषांचा येथे शिरकाव झाला आणि १९ व्या शतकामधे तर इंग्रजीचे सर्वांगीण वर्चस्व प्रस्थापित झाले. संस्कृत अध्ययनाची संधी उपलब्ध करून देणारी पुण्यातील संस्कृत पाठशाळा आणि प्रथम मुंबईत व नंतर इतरत्र सुरू झालेल्या इंग्रजी शाळा यांच्या वर्चस्वाखालीच मराठीसारख्या वर्तमान देशी भाषांना निमूटपणे आपला संसार थाटावा लागला, हा अलीकडचा इतिहास आहे. 'संस्कृत अध्ययन बलेकरून' मराठी व्याकरण रचणारे फडके, क्रमवंत व गोवे हे शास्त्री आणि इंग्रजी व्याकरणाचा परिचय झाल्यामुळे त्यापासून प्रेरणा घेऊन 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' रचणारे दादोबा ही एकाच वेळी दोन टोके दिसल्यामुळे मराठी व्याकरणाचा गंगाजमनी प्रकार होणे अटळ होते. त्यात शिक्षण खात्याचे मेजर कँडीसारखे अधिकारी, ते सांगतील ते प्रमाण अशा दडपणामुळे मराठी व्याकरणाची कुतरओढ होणे अपिरहार्यच होते. अशाही स्थितीत बाळशास्त्री जांभेकर, दादोबा, कृष्णशास्त्री चिपळूणकर, रा. भि. गुंजीकर यांनी मराठी व्याकरणाचे 'मऱ्हाटीपण' राखण्याचा आपल्यापरीने प्रयत्न केला हे कसे विसरता येईल? गेल्या दोन शतकांत पाश्चात्त्य

शिक्षणपद्धतीच्या आगमनामुळे सर्वच ज्ञानशाखांमध्ये अल्पकालावधीत भरपूर स्थित्यंतरे झाली आणि वर्तमानाशी जुळते घेण्यासाठी अभ्यासकांची सतत दमछाक झाली हे नाकारता येणार नाही. मराठीमध्ये परंपरेमुळे आलेल्या संस्कृतच्या काही खुणा आहेत आणि इंग्रजी भाषेच्या नित्य वापरामुळे अनेक बाबतींत मराठीवर इंग्रजीचा प्रभाव पडला आहे; यातूनच आधुनिक मराठीचे रूप जर सिद्ध होत गेले असेल, तर दोन भिन्न व्याकरणपरंपरांचा आधार घेतला म्हणून बिघडले कोठे ? आश्चर्य आणि कौतुक याचे वाटले पाहिजे की, पूर्वपरंपरा नसताना केवळ पंचवीस-तीस वर्षांचा कालावधी उलटताच मराठी व्याकरणकार प्रश्न उपस्थित करू लागले, फेरविचार करू लागले आणि प्रसंगी स्वतःलाही दुरुस्त करू लागले. त्यामुळेच या दोनशे वर्षांत नावे ठेवण्यासारखे अनेकजण असले, तरी नाव घेण्यासारखे पाच-दहा तरी स्वतंत्र बुद्धीचे व्याकरणकार आढळतात, ही जमेची बाजू नव्हे काय? स्वतःला मराठी भाषेचे अभ्यासक म्हणावयाचे आणि संस्कृतच्या चष्म्यातून पाहून मराठीला हिणवायचे, ही संस्कृत पंडितांची रीतच आहे. यातही गमतीचा भाग असा की, ज्यांनी संस्कृतचे व्याकरणशास्त्र चांगले पचविले आहे, शास्त्रग्रंथलेखनाची शिस्त ज्यांना अवगत आहे ते स्वतःला पटलेले शास्त्रशुद्ध असे समग्र व स्वतंत्र मराठी व्याकरण लिहीत नाहीत, तर केवळ परंपरा नसलेल्या पण धडपडणाऱ्या मराठी व्याकरणकारांच्या चुकांना हसण्यात भूषण मानतात. मग ते इतिहासाचार्य राजवाडे असोत, गो. कृ. मोडक असोत, मंगरूळकर असोत किंवा अर्जुनवाडकर असोत. या सर्वांनी फार तर 'समस्यांचा शोध' घेतला, पण स्वतःला आदर्श वाटणारे मराठीचे संपूर्ण व्याकरण काही रचून दाखवले नाही. यांच्या तुलनेने कृष्णशास्त्री चिपळूणकर, रा. भि. गुंजीकर, इतकेच कशाला, नंतरचे रंगाचार्य रड्डी यांनी, संस्कृतची बैठक पक्की असूनही मराठीच्या बाबतीत न्याय्य अशीच भूमिका घेतली. दादोबा, रा. भि. जोशी, मोरो केशव दामले आणि म. पां. सबनीस यांनी ठायी ठायी चुका केल्या असतील, पण त्यांना जे सांगावयाचे होते ते त्यांनी स्वतःचे व्याकरणग्रंथ रचूनच सांगितले, त्यांचे हे श्रेय नाकारून चालणार नाही.

### अर्जुनवाडकरांचे श्रेय

या साऱ्याचा अर्थ असा नव्हे की, मराठी व्याकरणकारांनी अल्पसंतुष्ट राहावे आणि चुका करण्यात किंवा चुकांचे समर्थन करण्यात भूषण मानावे. मराठी व्याकरणकार याच वृत्तीने वाटचाल करत राहतील, तर अर्जुनवाडकरांचा 'पोलिओ सिद्धांत' खरा ठरेल. पण मराठी व्याकरणकार भाषेबद्दल अनाग्रही, वस्तुनिष्ठ आणि कालोचित अशी भूमिका स्वीकारत असल्याची चिन्हे आता दिसत आहेत. पाणिनी म्हणतो ते केवळ प्रमाण नव्हे, तसे चॉम्स्की म्हणतो तीही दगडावरची रेघ नव्हे एवढेच तारतम्य नवीन अभ्यासकांजवळ आहे. भाषा अवतरते ती आपल्या विशेषांसह. व्याकरणकाराने फक्त हे विशेष कोणते ते सप्रमाण

दाखवून द्यायचे असतात आणि भाषेचे व्यवस्थापन मांडून दाखवायचे असत.

अर्जुनवाडकरांनी मोठ्या मेहनतीने, चिकाटीने आणि प्रतिकूल परिस्थितीवर मात करून हा 'मराठी व्याकरणाचा इतिहास' सिद्ध केला, याबद्दल मराठी अभ्यासकांनी कृतज्ञच राहिले पाहिजे. हा ग्रंथ म्हणजे मराठी भाषाभ्यासातील निर्विवादपणे एक टप्पा किंवा मैलाचा दगड आहे. इतक्या परिश्रमाने आणि चौफेर अवधान बाळगून असे ग्रंथ वारंवार निर्माण होत नाहीत हे लक्षात घेऊन मराठी अभ्यासकांनी अर्जुनवाडकरांच्या परिश्रमाला दाद दिली पाहिजे. केवळ भावडेपणाने अर्जुनवाडकर जे म्हणतात ते जसेच्या तसे स्वीकारायचे, असे न करता त्यांची सर्व विधाने डोळसपणाने पारखून घेतली पाहिजेत. जे पटत नाही तसे ते स्पष्टपणे नोंदवले पाहिजे. एक प्रमाणभूत इतिहासग्रंथ म्हणून प्रशंसा करण्यासारखी या ग्रंथाची गुणवत्ता इतकी मोठी आहे की, त्यातील उणेअधिक दाखवणे म्हणजे मराठी व्याकरणविचार अधिक बळकट करणे होय. हा अपूर्व ग्रंथ सिद्ध केल्याबद्दल अर्जुनवाडकरांचे अभिनंदन तर केले पाहिजेच, पण त्यांनी आता मराठीचे एक संपूर्ण नवे व्याकरण सिद्ध करावे, अशी अपेक्षा करणेही गैर होणार नाही.

(मराठी व्याकरणाचा इतिहास : कृष्ण श्री. अर्जुनवाडकर, मूल्य : उत्तम संस्करण, रु. २५० /—, साधारण संस्करण रु. २००/— प्रकाशक : मुंबई विश्वविद्यालय मराठी विभाग मुंबई आणि ज्ञानमुद्रा, पुणे, पृष्ठ १५ + ४१५)

(फर्गसन महाविद्यालय, पुणे ४११००४)

□

**श्रीमती शकुंतला विनायक कापरे यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाला भेट दिलेली पुस्तके**

(१) किंग लियर, (२) ज्युलियस सीझर, (३) नसत्याचा नगारा, (४) तुफान, (५) प्रेमगुंफा, (६) व्हेनिसनगरचा व्यापारी, (७) बारावी रात्र, (८) चतुरगडच्या विनोदी स्त्रिया, (९) लव्हज् लेवर्स लॉस्ट, (१०) किंग हेन्री द सिक्स्थ, (११) सिंबेलाईन, (१२) किंग जॉन, (१३) किंग रिचर्ड द सेकंड, (१४) अथेन्सचा टी मॉन, (१५) ट्रोलिस व क्रिसिडा, (१६) कोरोओलियन्स, (१७) पेरिक्लिस, (१८) व्हेरांनचे दोन ग्रहस्थ, (१९) हेन्री द फोर्थ, (२०) टेमिंग ऑफ द श्रू, (२१) टायटस अँन्ड्रा निकस, (२२) किंग रिचर्ड द थर्ड, (२३) किंग रिचर्ड द फोर्थ, (२४) विंटर्स टेल, (२५) रोमियो अँन्ड ज्युलिएट, (२६) मधुयामिनी स्वप्नदर्शन, (२७) मेजर फॉर मेजर, (२८) किंग हेन्री द एट्थ, (२९) हॅम्लेट, (३०) ॲथेल्लो, (३१) प्रस्तावना खंड.

या सर्व पुस्तकांचे लेखक— प्रा. वा. शि. आपटे

प्रकाशक— सरिता प्रकाशन, पुणे.

**या भेटीबद्दल श्रीमती शकुंतला कापरे यांचे परिषदेच्या वतीने आभार.**



अनुक्रमणिका








डॉ. व. दि. कुलकर्णी

# 'शुद्धलेखन-विवेक' च्या निमित्ताने

डॉ. द. न. गोखले यांचे 'शुद्धलेखन-विवेक' हे पुस्तक अभ्यासले. यातील विवेक सुयोग्य आहे. शासनमान्य नियमांतील त्रुटी पूर्ण करून, त्यामागील गृहित तत्त्वांचा उलगडा करून आणि वैकल्पिक रूपांचा अनाग्रहीपणे स्वीकार करून डॉ. गोखले यांनी 'परिवर्धित नियमावली' जी सिद्ध केली आहे, ती फार उपयुक्त आणि आवश्यक ते मार्गदर्शन करणारी आहे. पुरोगामी सुधारणा करण्यापेक्षा अनुगामी सुधारणा करणे फलदायी ठरते, या दृष्टीने डॉ. गोखले यांनी रूढ स्वीकृत नियमावलीचा पुनर्विचार आणि परिवर्तन केलेले आहे. तत्त्वतः हे धोरण ठीक आहे. पण आज शुद्धलेखनासंबंधी विचार करताना पारंपरिक स्थिर स्वरूपाचे शुद्धलेखन आजच्या व उद्याच्या पिढीच्या आकलनात आणि आटोक्यात कितपत येणारे आहे, हे पाहणे अटळ झाले आहे.

महामंडळाचे व शासनमान्य असे आजचे शुद्धलेखनाचे नियम हे संस्कृताश्रयी आहेत, हे स्पष्ट आहे. तसे नियमावलीकर्त्यांनी कोठे म्हटलेले नाही; पण ते गृहित धरले असल्याचे स्वच्छ जाणवते. या नियमावलीतील ऱ्हस्व-दीर्घ-लेखनासंबंधीचा भाग हे सिद्ध करणारा आहे. मराठी शुद्धलेखनातील सर्वसामान्य जनांना घोटाळ्यात टाकणारा भाग हाच आहे. शब्दकोशात 'कवि' ('वि' ऱ्हस्व), वाक्यात 'कवी' ('वी' दीर्घ), समासात, पूर्वपदी 'कवि-हृदय' ('वि' ऱ्हस्व) हे नियमानुसार कसे होते, हे सांगता येते; पण त्यासाठी ह्या शब्दाचे संस्कृत भाषेतले रूप माहीत असणे, आवश्यक असते. अकारान्त शब्दातील उपान्त्य 'इ'कार व 'उ'कार दीर्घ असतात. 'चूल', 'वीट' इ. पण 'गुण', 'विष' येथे ते ऱ्हस्व असतात. का ? ते तत्सम शब्द आहेत; म्हणजे संस्कृतमधून जसेच्या तसे– अविकृतपणे– आलेले आहेत. तत्सम शब्दांचे लेखन मुळातल्याप्रमाणे असावे, हा नियम. उपान्त्यपूर्व 'इ' कार व 'उ' कार ऱ्हस्व असावा. विहीर– विहिरीचा; पण 'गीता'– 'गीतेत' असे रूप करावे; कारण तत्सम शब्दांबाबत हे मूळ रूप पाळायचे. येथे नियमांत कोठे विसंगती किंवा शिथिलता नाही. पण यासाठी तत्सम शब्दांचे यथार्थ ज्ञान गृहित धरलेले आहे. ज्या पिढीने संस्कृत भाषेचा अभ्यास केला, संस्कृत वाङ्मय वाचले, त्यातील लेखनाची परिपाठी ठेवली त्या पिढीला हे अनाकलनीय नाही; उलट नवे वळण स्वीकारणे, जड जाणारे आहे. पण आज घटकेच्या व उद्याच्या पिढीचे काय ?

आजच्या अभ्यासक्रमातून संस्कृत जवळजवळ गेल्यासारखेच झालेले आहे.



अनुक्रमणिका








सभासम्मेलनांतून, ग्रंथांतून येणारी भाषा ही पूर्वीसारखी निखालसपणे 'प्रमाण' राहिलेली आहेच, असे म्हणणे वस्तुस्थितीस धरून होईलसे वाटत नाही. शुद्धलेखनाची नियमावली करण्यासाठी 'प्रमाणभाषा'च आधारभूत घेणे योग्य आहे, यात वाद नाही. 'प्रमाणभूत' म्हणून स्वीकारलेली भाषा शिकवताना, शिकविणाराही त्या 'प्रमाणभूत' भाषेत शुद्ध रीतीने बोलणारा-लिहिणारा, व्यवहार करणारा असावा लागतो. आज हीही स्थिती राहिलेली नाही. तेव्हा संस्कृतचा आधार सुटलेला, सभा-सम्मेलनांत कानी पडणारी भाषा पूर्वीची 'प्रमाणभाषा' न राहिलेली आणि अध्यापकांमध्येही हीच स्थिती असलेली– अशा अवस्थेत संस्कृताश्रयी ऱ्हस्व-दीर्घ-विचार कितपत आकलनीय व स्वीकारक्षम होईल, याचा वास्तववादी दृष्टीने विचार करणे क्रमप्राप्त-कालप्राप्त-झालेले आहे.

एप्रिल १९७९ मध्ये, मराठी साहित्य महामंडळाने मान्य केलेल्या मराठीच्या शुद्धलेखनविषयक नियमांमध्ये सुधारणा व दुरुस्त्या करण्यासाठी महामंडळाने एक स्थायी समिती नियुक्त केली होती. या समितीत सर्वश्री वा. रा. ढवळे, प्रा. म. वि. फाटक, प्रा. ह. श्री. शेणोलीकर, प्रा. रा. व. माढेकर या सदस्यांचा समावेश करण्यात आलेला होता. या स्थायी समितीचा मी निमंत्रक होतो. शुद्धलेखनविषयक नियमांत ज्यांना सुधारणा किंवा बदल सुचवायचे आहेत, त्यांनी पत्रद्वारा ते निमंत्रकांना कळवावेत, असे विनंति-पत्र, त्या वेळी मराठीतील महत्त्वाच्या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध केले होते. त्यास महत्त्वाचा प्रतिसाद मिळाला. प्राथमिक शाळेतील शिक्षकांपासून मराठी तत्त्वज्ञान-महाकोश-मंडळातील सदस्यांपर्यंतच्या अधिकारी अभ्यासकांनी आपले विचार व्यक्त केले होते. डॉ. अशोक केळकर, प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांसारख्या शुद्धलेखन तज्ज्ञांनी विस्तृत टिपणे पाठवून व प्रसंगी चर्चा करून आपल्या भूमिका विशद केल्या होत्या. मुंबई मराठी साहित्य संघामध्ये दोन मोजकी चर्चासत्रेही आयोजित करण्यात आली होती. या पत्रांतून आलेल्या सूचना-सुधारणा व चर्चांतून व्यक्त झालेल्या भूमिका यांचे इतिवृत्त रायपूर-सम्मेलनानंतर मी महामंडळाला सादर केले होते; त्या इतिवृत्ताबरोबर मी माझे मतही स्पष्ट केले होते. आज हे इतिवृत्त-पत्र माझ्या हाताशी नाही. पण त्यातील महत्त्वाचा आणि ठळक विचार मी येथे मांडत आहे.

अंकलेखनासंबंधीचा नवविचार, मुद्रणसुलभ लिपीसुधारणा, बाराखडीसंबंधीचा पुनर्विचार, संस्कृतेतर तत्सम शब्दांचे लेखन, अमराठी भाषकांसाठी 'श्रवणप्रत्ययी लेखनयुक्त शब्दकोशनिर्मिती' इत्यादीसंबंधी मनःपूर्वकतेने अनेकानेक सूचना या पत्रांतून करण्यात आलेल्या आहेत. पण मुख्य सूर किंवा भर, (आग्रहही म्हणता येईल) तो 'संस्कृताधार वगळून ऱ्हस्व-दीर्घ-विचार व्हावा' ह्यावर–ह्यासंबंधीचा आहे. 'संपूर्ण संस्कृताश्रयी शुद्धलेखन-नियमावली ठेवावी' असे म्हणणारे अपवादात्मक आहेत. 'महामंडळ किंवा शासनमान्य नियमावली ही एक तत्त्वशून्य तडजोड आहे,' असे बव्हंशी मत आहे. बहुतांना बहुतांशी समजेल, वापरता येईल, रुळवता येईल आणि रुळून रूढ करता

येईल असे नियमबद्धच, पण सोपे व उपयुक्त असे शुद्धलेखनाचे नियम असणे आवश्यक आहे, याकडे लक्ष वेधण्याचा बहुतेकांचा प्रयत्न आहे. भाषा ही सामाजिक संस्था आहे, आणि जिवंत आणि प्रवाही भाषेची धारणा, प्रवृत्ती आणि कल पाहून तिच्या व्याकरणाची आणि लेखनाची व्यवस्थापना होणे अटळ असते.

१९७२ पासून ऱ्हस्व-दीर्घासंबंधीचे नवे नियम आपण स्वीकारून ते प्रत्यक्षात आणण्याचा प्रयत्न केला. संस्कृत तत्सम शब्दांचे ज्ञान आणि भान असणाऱ्या लोकांनी ही सुधारणा जाणीवपूर्वकतेने, मोठ्या समजुतीने कार्यवाहीत आणली, आणि ही सुधारणा पचनी पडावी असे प्रारंभी जाणवले. पण आता पाहावे, तर याबाबत वस्तुस्थिती उलट झालेली दिसते. उत्तरोत्तर ऱ्हस्व-दीर्घ-लेखन हे स्वैर आणि संयुक्त होत चाललेलेच आढळून येत आहे. संस्कृताश्रय सुटला आणि तत्संबंधी अज्ञान वाढले व ही परिस्थिती निर्माण झाली. त्यामुळे बहुविध स्तरांतले विद्यार्थी व अध्यापक ज्या वेगाने व ज्या बहुसंख्येने शिक्षण घेत-देत आहेत, ते पाहता 'हे होणे' साहजिक-स्वाभाविक आहे. त्यात पुन्हा इंग्रजी-माध्यमाची भर पडली आहे. शिशुवर्गापासून इंग्रजी माध्यमातून शिकणारी पिढी मराठीला 'जाणत' नाही, म्हणजे त्यांना नीट मराठी येत नाही व ते मराठीला मानीतही नाहीत. मराठीतील लेखन शुद्ध लिहिता आले नाही, तर त्याचे त्यांना काही वाटत नाही. इंग्रजी स्पेलिंग चुकले तर अपराधी वाटते. या मुलांना जेथे मातृभाषाच परकी होते, तेथे तिची मूळ अधिष्ठात्री संस्कृत भाषा हिचे सोयर-सुतक ते काय असणार? अशा बालकांचे व पालकांचे मराठी उच्चार व मराठीतले लेखन वाचून पाहावे. आपल्या कानांना व डोळ्यांना इजा होते. हे प्रमाण वाढते आहे. अशांच्याही पचनी पडेल, असे काही करणे आता अपरिहार्य झाले आहे. चिपळूणकर-टिळक-आगरकर हे इंग्रजी वाघिणीचे दूध प्याले, पण ते इंग्रजीचे 'शार्दूल' आणि मराठीचे 'केसरी' होते; आजची ही पिढी 'ना इधर ना उधर' अशी भाषादृष्ट्या बेवारशी झालेली आहे. तेव्हा तळागाळातून येणारा वर्ग आणि हा तथाकथित उच्च संस्कृतीमधून उद्‌भवलेला वर्ग– हे दोन्हीही वर्ग ध्यानी घेता, नियमांत बसवून मराठी शुद्धलेखन कसे करावे, हे यांना सांगणे व ते त्यांच्या पचनी पाडून अंगी लागेल असे करणे, ही काळाची गरज आहे.

हे कसे करता येईल? अतिशय अवघड, बिकट अशी ही गोष्ट आहे. सरधोपट असा नियम करता येईल– सर्व अन्त्य 'इ' कार व 'उ' कार दीर्घ; सर्व उपान्त्य 'इ' कार व 'उ' कार दीर्घ आणि सर्व उपान्त्यपूर्व 'इ'कार व 'उ'कार ऱ्हस्व लिहावेत, हा नियम सर्वांना कळण्यासारखा पचनी पडण्यासारखा व वापरता येण्यासारखा आहे. पण यामुळे मूऊ भाषिक रूपांवर काही वेगळ्या उच्चारणाचे आक्रमण तर होणार नाही ना? होणार. मूळ भाषित-रूपेच अशुद्ध होऊन बसतील. म्हणून असा सरधोपट मार्ग चुकीचा ठरेल. सध्या रूढ असलेल्या नियमावलीत पुढीलप्रमाणे बदल करून घेतल्यास ही आपत्ती ओढवणार नाही.










हे बदल किंवा सूचना अशा :

१) सामासिक व साधित शब्दांतील पहिले पद (ऱ्हस्व) 'इ' कारान्त किंवा 'उ'कारान्त संस्कृत शब्द असेल (तत्सम असेल) तर मुळाप्रमाणे ते ऱ्हस्वान्तच लिहावेत. हा नियम वगळावा. त्यामुळे 'कविराज' याऐवजी 'कवीराज' असे लिहिता येईल.

२) तत्सम शब्दांतील अकारान्तापूर्वीचे 'इ'कार व 'कार' मूळ संस्कृतातल्याप्रमाणे ऱ्हस्वच लिहावेत. हा नियम वगळावा. त्यामुळे 'गुण', 'विष' हे शब्द 'गूण' 'वीष' असे लिहिता येतील.

३) तत्सम शब्दांतील उपान्त्य अक्षरे (दीर्घ) 'ई'कारान्त व 'उ'कारान्त असतील, तर मराठीत ती मूळ संस्कृतातल्याप्रमाणे (= तत्सम रूपातच) लिहावीत, हा नियम वगळावा. म्हणजे 'नीती', 'कीर्ती' हे शब्द 'निती', 'किर्ती' असे होतील. (हे प्रारंभी कानाला व डोळ्याला फार चमत्कारिक वाटेल/वाटते. पण सवयीने ते कानवळणी, नेत्रवळणी व हातवळणी पडणारे आहे. प्रारंभी 'कवि', 'रवि' हे शब्द 'कवी', 'रवी' असे दीर्घान्त लिहिताना आपणास काय कमी मनःक्लेश झाले ? पण आता ही बाब सहजसुंदर होऊन गेलेली आहेच ना ?)

एवढ्या जरी दुरुस्त्या केल्या, तरी आजचे ऱ्हस्व-दीर्घविषयक जे अराजक, जो अज्ञानजन्य गोंधळ आहे, तो खूपसा थांबेल; त्यास आळा बसेल. वीस वर्षांचा– म्हणजे एका पिढीचा– काळ देऊनही जे घडले नाही, उलट वाढले, ते ऱ्हस्व-दीर्घांचे अशुद्ध लेखन यामुळे सोपे व समरूप होईल (Simple and uniform). अखेर सोसायचे असते, समजुतीने घ्यायचे असते ते जाणत्यांनीच ! वैय्याकरणांनी प्रयोगशरणच असावे लागते. अज्ञान आणि आळस यांनी भाषा बदलते, असे म्हटलेलेच आहे. भाषा ही समाजाची निर्मिती आहे. कोणा एका शासनाच्या, विद्वत्परिषदेच्या आज्ञेने घडणारी व चालणारी ती संस्था नाही. तेव्हा तिचे नियमन करून, ती अधिकाधिक स्थायी राहून, क्रियाशील कशी होईल, हे पाहणे आपले कर्तव्य ठरते. पूर्णपणे उच्चारानुसारी लेखन (कितीही उच्चारण-ध्वनींचा वापर केला तरी) होऊ शकत नाही, हे निर्विवाद आहे. अखेर भाषा ऐकून व बोलूनच बोलता येते. आपले इंग्रजी उच्चार व मूळ इंग्लिश-अमेरिकन व्यक्तींचे उच्चार यात किती फरक असतो ? तेव्हा भाषेचे लिखित रूप, आवश्यक ते नियम घालून सोप्यात सोपे व सर्वांस प्रत्यक्ष उपयोगात आणता येतील असे असणे आवश्यक आहे. याचा विचार व्हावा.

डॉ. गोखले यांनी हा विचार केलेला आहे. त्यांनी 'दुर्वा', 'पितांबर', 'दिपावली' ही शब्दरूपे; तसेच 'गूण', 'वीष', ही शब्दरूपे प्रमाण-मराठीच्या भाषित रूपात तर आहेतच; पण थोडीफार प्रमाण-मराठीच्या लिखित रूपातही ती केव्हा केव्हा डोकावतात, असे म्हटले आहे (पृ. ७७). 'भाषा परिवर्तनशील आहे आणि तीमध्ये हे परिवर्तन बहुधा तिच्या भाषित

स्वरूपात आधी होते, मग ते बहुधा 'प्रमाण भाषित स्वरूपात' होते, आणि मागाहून बहुधा प्रमाण' लिखित स्वरूपात होते,' असेही त्यांनी म्हटले आहे. 'दुर्वा', 'पितांबर', 'गूण', 'वीष' इत्यादी शब्द परिवर्तन-प्रक्रियेच्या यांपैकी कुठल्यातरी टप्प्यावर उभे आहेत' हेही त्यांनी नमूद केले आहे (पृ. ७७). आज मराठी भाषेतील वाग्व्यवहार इतक्या विविध पातळ्यांवर, विविध रूपांनी व गतींनी एकमेकांत सरमिसळ होत चालला आहे की, हे टप्पे आता उरतील असे वाटत नाही. तेव्हा आज ना उद्या, कालगतीने जे घडणार आहे, ते आता नियमित करून समाजाला देणे इष्ट नव्हे का ? आणखी बिघडलेल्या, नव्हे, बदललेल्या, स्थितीत काळाने ते घडविण्यापेक्षा आजच आटोक्यात येऊ शकणाऱ्या परिस्थितीत आपण हे करणे योग्य ठरणार नाही का ? याबाबतीत 'अनुगामी धोरणा' ऐवजी 'पुरोगामी धोरण' स्वीकारणे आवश्यक ठरावे.

१०-१२ वर्षांपूर्वी मी हा विचार महामंडळापुढे मांडला होता. पण महामंडळात अंतर्गत फार मोठ्या उलथापालथी झाल्या व 'शुद्धलेखन-सुधारणा-समिती' चे कामही आपोआपच स्थगित झाले. डॉ. गं. ना जोगळेकर यांनी हे काम महामंडळातर्फे नव्याने हाती घेतले आहे (मे १९९० मध्ये). या नव्या शुद्धलेखन-सुधारणा-समितीने पुणे येथे घेतलेल्या पहिल्या दोन सभांना निमंत्रित म्हणून मी उपस्थित राहिलो होतो व तेथे मी माझे वरील विचार मांडले होते.

(शुद्धलेखन-विवेक : डॉ. द. न. गोखले, सोहम् प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १४ + १६८, मूल्य ९० रुपये)

(महालक्ष्मी अपार्टमेंट्स, रामबाग, पौड रस्ता, पुणे ४११०३८.)

---

## साभार स्वीकार

८. **मराठी कथासाहित्य : एक आलेख**– प्रा. म.ना. अदवंत, नीहारा प्रकाशन, पृष्ठे ११६, मूल्य ६०/- रु.

९. **यशवंतराव चव्हाण व्याख्यानमाला**– कऱ्हाड नगरपालिका, पृष्ठे १२५, मूल्य ४०/- रु.

१०. **अंत:स्थ**– प्रज्ञा लोखंडे, मानसन्मान प्रकाशन, पृष्ठे ४९, मूल्य ३०/- रु.

११. **आनंदनिधान**– सार्वजनिक वाचनालय, नाशिक, पृष्ठे ८४, मूल्य ५०/- रु.

१२. **अवसर**– ऑक्टोबर ९२, सार्वजनिक वाचनालय, नाशिक, पृष्ठे ४२.

१३. **भारतीय स्वातंत्र्याचे स्वप्नद्रष्टे**– पं. श्यामजी कृष्ण वर्मा, पां. ज. भानुशाली, नव्हाळी प्रकाशन, पृष्ठे ८८, मूल्य ४०/- रु.

१४. **मोगरा फुलला भक्तीचा**– सौ. शैलजा चरेगावकर, ग्रंथविशेष प्रतिष्ठान, पृष्ठे५६, मूल्य ३०/- रु.



अनुक्रमणिका







गोपीनाथ तळवलकर

# य. न. केळकर यांची प्रासादिक कविता

श्री. यशवंत नरसिंह केळकर यांचा हा अलीकडील काव्यांचा संग्रह आहे. या कविता कुठेही प्रसिद्ध झालेल्या नाहीत. यशवंतराव हे साहित्यसम्राटांचे चिरंजीव आहेत हे भाग्य होय. पण यशवंतरावांनी जीवनात आपला म्हणून एक बाज निर्माण केला आहे. त्यांची प्रज्ञा स्वतंत्र आहे. त्यांच्या व्यासंगाची कल्पना मलपृष्ठावरील त्यांच्या ग्रंथांची यादी पाहून येईल. इतिहासाच्या अभ्यासापासून पुराण, संगीत, वाङ्मय यांतही त्यांची बुद्धी रमलेली आहे.

मुख्य म्हणजे कविता जाति, वृत्त, छंद यांनी निबद्ध आहे. प्रत्येक ओळीचा अर्थ कळतो. सर्वच नवकवी न कळणारे लिहितात किंवा अंतर्मनातील खळबळ सांगण्याचा आव आणून अनाकलनीय शब्दरचना करतात असे नाही. पण 'पुण्यप्रभावा'तील नूपुराच्या प्रमाणे 'काव्याचा अर्थ कळल्यावर कवींची काय बरे मातब्बरी राहिली' असे पुष्कळ नवकवींना वाटते ! यशवंतराव हे वयाने आणि वृत्तीने या नवकवींत सामील होणारे नाहीत, हे सुदैव होय. त्यांच्या कवितांत प्रसाद तर आहेच, पण प्रेमही आहे.

वास्तविक पाहता जुनी आणि नवी कविता, हा वादच चूक आहे. कविता चांगली किंवा वाईट असू शकते. आज अनेक नवी नाटके मागे पडली, पण 'सौभद्र' सारख्या नाटकाची शताब्दी होऊन गेली, तरी ते तितकेच लोकप्रिय आहे. हे एकच उदाहरण पुरेसे आहे.

*हा गा सूर्य का शिळा*
*अग्नि कैसा म्हणावा ओवळा*
*का नित्य वाहत्या गंगाजळा*
*पारसेपण असे ॥*

हे ज्ञानेश्वर महाराजांचे रमणीय शब्द विचार करायला लावतील असेच आहेत.

आपल्या प्रख्यात तीर्थरूपांप्रमाणे यशवंतराव अनेक कलांत रस घेतात. नामवंत गायिका किशोरी आमोणकर यांचा जलसा असा बहारदार रीतीने त्यांनी रंगविला आहे :

*सजीव भासणाऱ्या परि निर्जिव*
*पुतळ्याचे करी खुले प्रदर्शन*
*शिल्पकार कसबी कारागिर*
*सूर तव तसे करी सभाजन ।*
*काय सुरांचे यास्तव कौतुक*
*गायन गात्रच हो रोमांचित*

*चंद्र उगवुनी येतो वरती*
*पंख चांदण्यांचे जणु पसरित*

किशोरीताईंचे गाणे ऐकणाऱ्या रसिकांना तर कवीचे वर्णन पटेलच, पण ज्यांनी त्यांचे गाणे ऐकले नाही त्यांचीदेखील उत्सुकता जागृत होईल.

प्रेम, आकाश, जीवन, मृत्यू, जरा इ. विषयांवरील कविता वैशिष्ट्यपूर्ण आहेत. आकाश उडून गेले तर काय होईल ? यशवंतराव म्हणतात-

*आकाश उडून गेले तर ?*
*तारा-गारा विरल्या तर ?*
*चंद्र सूर्य विझले तर ?*
*काय जगाचे होईल ? तर*
*होईल त्याचे वारूळ*
*कालसर्पाचे राऊळ*
*करून मुंग्यांचा फराळ*
*गाठिल मग तो पाताळ*

यावरून कवीच्या कल्पनेची झेप किती आहे ते लक्षात येईल.

*सोडून गेले पैलथडीला बरोबरीचे सर्व गडी*
*रानपाख्या परि एकाकी घुमतो मी या ऐलथडी*

हा अनुभव प्रत्येकाला येईल. किंबहुना साहित्य म्हणजे तरी काय ? जे पुष्कळदा वाटते, पण इतके चांगले पूर्वी कधीच त्याला शब्दरूप मिळत नाही (What oft was thought But never so well expressed).

यशवंतरावांच्या प्रेमकाव्यात कायिक संवेदना जरूर आहेत, पण तेथेच ते थांबले नाहीत. त्याहून वर असलेले प्रेम अनेक ठिकाणी व्यक्त झालेले आहे. जगद्गुरू जे. कृष्णमूर्ती म्हणतात, 'प्रेम हाच परमेश्वर आहे.' हीच भावना यशवंतरावांची दिसते. 'ग्रीवाभंग कपोतिकेपरी. . .' हे यशवंतरावांचे कवितेतील शब्द अजूनही आठवतात. ग्रामीण साहित्य असे आज दालन निर्माण झाले आहे. अर्थात त्यात वावगे काही नाही. पण राजकवी यशवंतांच्या

*अजुनि कसे येतीना परधान्या राजा*
*किरकिरती रातकिडे झाल्या तिन्हीसांजा*

या सुंदर ओळींप्रमाणे यशवंतरावांच्या

*परी न गवळी आला अजुनी ।*

याचीही दखल घेतली पाहिजे.

गोविंदाग्रज, तांबे, विनायक, बालकवी यांचे ध्वनी-प्रतिध्वनी 'परागपुष्पां'तून ऐकू येतात आणि ते साहजिकही आहे. 'समकालीन चेहरा' (contemporary appearance) म्हणून

काही असतोच. संशोधकांना या कवितेचा काल कोणता हे ठरविता येईल.

'नवे भस्मासुराख्यान' याचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. यामध्ये संस्कृत टीपा आहेत. 'कविता म्हणजे जीवनाचे भाष्य' (poetry is nothing but criticism of life) ही मॅथ्यू अर्नोल्डची व्याख्या यशवंतरावांना मान्य आहे असे दिसते. या दीर्घ कवितेतील पुढील ओळी पाहा-

*भस्मासुर जातीच असुर*
*दया, कृतज्ञता त्या दूर*
*त्यात आता अहंकार पूर*
*मत्त राक्षस जाहला*

*तेवी ज्ञानाच्या स्पर्शाने*
*अज्ञान बने विज्ञान*
*परी विज्ञान ते विज्ञान*
*ज्ञानाची सर त्या कोठुन*

एका सर्वश्रुत पौराणिक कथेवर रचलेले हे काव्य माणसाच्या शाश्वत स्वभावाची आणि सद्य परिस्थितीची ओळख करून देणारे आहे.

यशवंतरावांना संध्याछायेची चाहूल लागली आहे. स्वतःचा स्वभाव कसा आहे, यावर मनन करण्याइतकी वस्तुनिष्ठता लाभली आहे. त्यांचे आपल्या मुलाबाळांवर, नातवंडांवर प्रेम आहे. आणि ते प्रकट करण्यात कसलाही संकोच त्यांना वाटत नाही.

(परागपुष्पे : कवी य. न. केळकर, प्रकाशिका : उषा आगरकर, कृषि उद्योग मूलशिक्षण संस्था, मु पो. कऱ्हाटी (जि. पुणे) ४१२ २०४)

(५/२८, गोपीनाथनगर, कोथरूड पुणे ४११०२९)

---

**साभार स्वीकार**

१५. **ह्या कातरवेळी–** सौ. शैलजा चरेगावकर, ग्रंथविशेष प्रतिष्ठान, पृष्ठे ५६, मूल्य ३०/- रु.

१६. **सत्यं शिवं सुंदरम् अर्घ्य–** विजया संगवई, पुण्यश्लोक सद्गुरू शिवपार्वती प्रतिष्ठान, नाशिक, पृष्ठे २६, मूल्य १५/- रु.

१७. **कविता श्रमाची–** नारायण सुर्वे, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई, पृष्ठे ५४, मूल्य २०/- रु.

१८. **विज्ञानेश्वरी (साक्षरतेची गाथा) –** प्रा. शंभूनाथ कहाळेकर, साहित्य सेवा प्रकाशन, पृष्ठे ५८, मूल्य २५/- रु.

१९. **और नाटकका मुर्दा गिरनेके बाद–** प्रा. शंभूनाथ कहाळेकर, सौ सुनीता कहाळेकर, कविता प्रकाशन, पृष्ठे २३, मूल्य १०/- रु.



अनुक्रमणिका






शोभा वुचे

# छांदिष्ट व्यक्तिमत्त्वाचे लोभस शब्दचित्र

महाराष्ट्राला छांदिष्ट माणसांची वाण नाही. पण गंमत म्हणजे या छांदिष्ट माणसांना डावलून समाजाला पुढे जाताही येत नाही. मग ते राजवाडे असोत, केतकर असोत, मिराशी असोत, बाबासाहेब पुरंदरे असोत की गोपाळ नीळकंठ दांडेकर असोत. आयुष्याची प्रमेयं सोडवणारे तपस्वी हे छांदिष्टच असतात. त्यांच्या अशा काहीशा तऱ्हेवाईक मळभाआड झाकोळलेलं कर्तृत्वाचं चांदणं उपेक्षित तर राहतंच, पण त्या कर्तृत्वाचं योग्य मूल्यमापनही केलं जात नाही. त्यांच्यावरील अन्यायाचं परिमार्जन होण्यासाठी कोणाला तरी पुढाकार घेऊन त्यांच्या स्वभावातील विसंगतींचे दुवे सांधायचं काम करावं लागतं. गोपाल नीळकंठ दांडेकरांनी दीड एक तपापूर्वी 'स्मरण गाथा' हे आपल्या गतजीवनाचं अवलोकन करणारं लेखन जेव्हा केलं, तेव्हा त्यांच्या लेखनामागील प्रेरणा आणि व्यक्तिगत आयुष्य यांविषयी असलेले समज, गैरसमज, अपसमज दूर होण्याऐवजी त्यांच्याभोवतीचं हे धुकं अधिकच गडद झालं, असं म्हटल्यास वावगं होणार नाही. तसंच त्यांनी आपली ही संस्मरणं वयाच्या तिशीपर्यंतचीच लिहिल्यामुळे त्यापुढच्या अधिक मोठ्या कालखंडाविषयीचं कुतूहलही शमलं नव्हतं, तर वाढतच होतं. आता तर वार्धक्य आणि व्यक्तिमत्त्वाला झाकोळून टाकणाऱ्या व्याधींमुळे हा कुतुहलकंडू शमणार की नाही, अशा संभ्रमात मराठी वाचक असतानाच अचानक एक पुस्तक प्रसिद्ध झालं– 'आशक़ मस्त फक़ीर'. लेखिका वीणा देव. वीणा देव म्हणजे गो. नी. दांडेकरांची मुलगी, एवढंच ठाऊक होतं. तिचं काही लेखन वाचण्यात आलं नव्हतं. 'गोनीदां'बद्दल वाटणाऱ्या कुतूहलाला आता 'मुलगी काय म्हणत्येय बापाबद्दल'ची झालर चढली होती. कुतुहल शिगेला पोहोचलं. पुस्तक बाजारात आलं, वाचनालयांतूनही. पण हाती येण्याअगोदरच कोणीतरी ते पळवून नेई. आतासुद्धा 'आशक़ मस्त फक़ीर' पुस्तकाच्या मुद्दाम मागावर राहून मिळवावं लागलं आणि एका दमात वाचून संपवलं, तेव्हाच त्याच्या दुर्मिळतेचं कारणही समजलं.

गो. नी. दांडेकर पत्नी आणि तान्ह्या मुलीसह तळेगावला स्थायिक झाले तेव्हापासूनच्या लेखिकेच्या ह्या आठवणी आहेत. 'आशक मस्त फकीर' हे वीणा देव यांच्या वडिलांचं रूढार्थानं चरित्र नाही. 'स्मरण गाथे'चा उत्तरार्ध तर नाहीच. त्यामुळे ह्या पुस्तकाचा नेमका घाट कोणता, याचा निर्णय वाचकांवर सोपवलेला बरा. नवीनच प्रकार दृष्टीस पडला की, त्याची जमा कोणत्या प्रकारात करावी असा संभ्रम पडणं साहजिकच आहे. परंतु हा

'घाट' जाणूनबुजून घातलेला नाही. कृत्रिमतेचा तर लवलेशही आढळणार नाही. मात्र 'स्मरणगाथा' आणि 'भ्रमणगाथा' यांतून जाणवलेला 'मस्त फकीर' जीवनावरही किती 'आशक' आहे, ते दाखविण्यास अनुरूप आहे एवढं खरं.

'स्मरणगाथे'त दांडेकरांनी १२व्या वर्षी स्वातंत्र्यलढ्यासाठी महात्मा गांधींनी दिलेल्या हाकेला प्रतिसाद म्हणून घरातून पलायन केल्याविषयी सविस्तर लिहिलं आहे. पण आज महाराष्ट्र त्यांना स्वातंत्र्यसैनिक म्हणून ओळखत नाही. 'आणि मी संघकार्यकर्ता झालो,' असा त्यांनी स्मरणगाथेचा समारोप केला असला, तरी मराठी वाचक त्यांना केवळ संघकार्यकर्ता म्हणूनही मानीत नाही. कीर्तनकार, प्रवचनकार, ज्ञानेश्वरीची पारायणं, तुकारामाची गाथा मुखोद्गत करणारा वारकरी, शिवाजी महाराजांना दैवत मानणारा, उज्ज्वल इतिहासावर प्रेम करणारा, 'माझ्या नावे जो धोंडा उभाराल त्यावर एकच ओळ कोरा : या वेड्या माणसानं डोंगरदऱ्यांवर विलक्षण प्रेम केलं' असा आदेश देणारा, निसर्गाचं विविध रूप, मग ते डोंगर, दऱ्या, नद्या, ओहोळ, वृक्ष, झाडंझुडपं, फुलं, वारा-वादळं, ढग-'ढगुलं', विविध रंगांचे आणि विविध आकारांचे दगड, माती, चिखल असं कोणचं का असेना, त्यानं वेडावून जाणारा, दुर्गभ्रमणाच्या ओढीनं झपाटलेला, वेदान्तपर तसंच मुलांसाठी उपदेशपर, माहितीपूर्ण आणि समाजाची गरज म्हणून धार्मिक लेखन करणारा आणि जैत रे जैत, मृण्मयी, शितू, पडघवली, रानभुली, मोगरा फुलला, दास डोंगरी राहतो, तुका आकाशा एवढा, आनंदवन, तांबडफुटी, पवनाकाठचा धोंडी, माचीवरला बुधा इत्यादी विविध विषयांवर कादंबऱ्या लिहून मराठी कांदबरीचं दालन समृद्ध करणारा कादंबरीकार अशा विविध भूमिका बजावणाऱ्या दांडेकरांचं खरं रूप कोणतं, हे अवघ्या महाराष्ट्राला पडलेलं कोडं डॉ. वीणा देव यांनी सहजतेनं आणि चटपट सोडवलं आहे. चटपट म्हणण्यातल्या उद्देश हा आहे की, ह्या विविधांगी आणि गूढ वाटणाऱ्या व्यक्तिमत्त्वाचं दर्शन वीणाताईंनी केवळ एकशे पंचावन्न पृष्ठांतून घडवलं आहे. एवढंच नव्हे, तर कोड्याची उत्तरं थोडक्यात द्यायची असली तरी ती नेमकीच असावी लागतात, तिथं पर्यायी उत्तरं संभवतच नाहीत, याचं भान केव्हाही सुटलेलं नाही.

गो. नी. दांडेकर म्हणजे लेखिकेचे आप्पा. आप्पासाहेबांनी संघ, सेवादल, वारकरी पंथ, कीर्तनकार, प्रवचनकार म्हणून कार्य केलं असलं, तरी त्या त्या वेळी त्या त्या कार्याला ते सर्वभावे समर्पित झालेले असत. मात्र त्यातून अलिप्तपणे वेगळेही होत. 'वारकरी ज्या निष्ठेनं, श्रद्धेनं, पंढरपूरला जातात त्याच भावनेनं आप्पा किल्ल्यांवर जातात,' शिवाजीराजांच्या गडावर आप्पा अगदी निराळेच असतात. आनंदी. मनानं मुक्त. बखरीतली, आज्ञापत्रातली वाक्यं जिभेवर. शिवाजीराजांच्या समाधीपाशी ते नम्र होतात, भग्नावशेष पाहून खिन्न होतात. गडावरच्या रहिवाशांविषयी, ते शिवरायांच्या सान्निध्यात आहेत या भावनेनं आत्मीयता अन् अभिमान. शिवाजी महाराजांचा रायगडावर पुतळा



अनुक्रमणिका

उभारला, तेव्हा शासनानं देऊ केलेलं मानधनही नाकारून ते झोपडी बांधून राहिले. 'मी शिवाजी राजांचा पाणक्या किंवा हरकाम्या असेन,' अशी त्यांची दृढ श्रद्धा आहे, शिवाजी महाराज म्हणजे परम दैवत !

छायाचित्रांचं वेडही असंच. व्यक्तींची छायाचित्रं अपवादात्मकच. (त्यालाही अपवाद फक्त दुसरी नात मधुरा हिचा !) छायाचित्रण हाही त्यांनी घेतलेला निसर्गरूपांचा शोध आहे. त्यासाठी घेतलेले परिश्रमही नादिष्टपणाला साजेसे. असाच नाद दगड गोळा करण्याचा. कारण त्यातही त्यांना निसर्गसौंदर्याचाच प्रत्यय येतो. विविध रंगांचे दगड गोळा करायचे आणि त्याला सुबक आकार देण्यासाठी परिश्रमही करायचे ! असाच इतिहासकालीन वस्तूंचा आणि लोकगीतांचाही आत्मीयतेनं कष्टपूर्वक संग्रह केलेला. वाचन करतील तेही प्रामुख्यानं ऐतिहासिक काळावर प्रकाश टाकणारं. त्यातही समकालीनांपेक्षा नवीन तरुण लेखकांच्या पुस्तकांना प्राधान्य. विनोदी लेखनाचं वाचन हा विरंगुळा. साठाव्या वाढदिवशी साठ किलोमीटर चालण्याचा संकल्प सोडून तो जिवाच्या करारानं पूर्ण केला. याला छांदिष्टपणा म्हणायचं नाही, तर काय म्हणायचं ?

जगाच्या दृष्टीनं छांदिष्टपणात जमा होणाऱ्या गोष्टींवरच लेखिकेनं प्रकाश टाकला आहे असं नाही. आप्पांची दिनचर्या– अगदी वृत्तपत्र येण्यापूर्वी त्यांची चाललेली अस्वस्थ घालमेल, रेडिओवरच्या बातम्या ऐकणं, शास्त्रीय संगीताची ओढ, सुगंधाची आवड, साधा पण नीटनेटका पोषाख, अंथरूण-पांघरुणाबद्दल काटेकोरपणा, जेवणाखाणातला नेमस्त निग्रह, लिहिण्यासाठी पांढरेशुभ्र उत्तम दर्जाचे कागद, हिरवी शाई आणि रेखीव अक्षर यासकट सर्वांची नोंद लेखिकेनं मोठ्या मार्मिक शब्दांत हौसेनं केली आहे. मात्र ह्या बाह्य रूपापेक्षा त्या जेव्हा त्यांचा अंतर्वेध घेतात, तेव्हा मात्र आप्पांवर कोणत्याही प्रकारे अन्याय होणार नाही याची काळजी घेतात. मॅट्रिक होईपर्यंत माझे वडील लेखक आहेत म्हणजे नेमके काय आहेत हे मला कळत नव्हतं, असं लेखिका म्हणते आणि जेव्हा ते कळायला लागतं, तेव्हा ते नेमके काय आहेत याचा शोध घेण्याचा प्रयत्न करते. लेखिका म्हणते, 'कादंबऱ्यांमधून ते मला दिसताहेत.' काही नाटकं, कविता, काही गीतं, व्याख्यानं असे विविध प्रकार त्यांनी प्रयोगासाठी हाताळले, तरी लवचिकता आणि सर्वसमावेशकत्व या गुणांमुळे कादंबरी हे साहित्यरूपच त्यांना अधिक भावलं. जे पाहिलं, अनुभवलं तेच व्यक्त करण्याच्या ओढीनं त्यांनी लिहिलं. मन भावनाशील आणि प्रत्येक भावना अतिशय तीव्र. भारतीय संस्कृती, हिंदुत्ववादी राष्ट्रवाद यांचे ते शाहीर आहेत. यांचं गुणगान करता येईल आणि करता यावं म्हणून त्यांनी आपली लेखणी राबविली. मराठी मातीशी एकरूप झालेलं त्यांचं मन अमेरिकेतल्या मानवनिर्मित भव्यतेत रमलं नाही. 'संत साहित्यातील जीवनोद्धारक शक्ती हा आप्पांच्या पिंडाचा प्रमुख धर्म आहे,' असं त्यांच्या कन्येचं ठाम मत आहे. 'उत्कट भव्य तेचि घ्यावे' या ध्यासातून त्यांच्या कादंबऱ्यांमध्ये आदर्शवाद उमटला. शरच्चंद्र

चट्टोपाध्यायांप्रमाणेच आप्पांना 'दुःखाबद्दल ममत्व' आहे. त्यामुळेच 'व्रतस्थ, समर्पणशील, सोशीक पण प्रसंगी खंबीर अशा स्त्रियांच्या' मनोवृत्तीशी आप्पा समरस होऊ शकले. 'पडघवली'तली अंबूवहिनी, 'मृण्मयी'तले तात्या, 'भ्रमणगाथे'तील भटक्या, 'रानभुली' मधील मनी, पवनाकाठचा धोंडी ही आप्पाचींच रूपं आहेत. 'स्त्रीच्या कोमलते'बरोबर तिच्या खंबीरपणाचे अनेक रंग त्यांनी भरले. संकटकाळी त्यांचा कस लागतो. त्यांच्या नायिका प्रातिनिधिक नाहीत. त्या खास 'दांडेकरी' आहेत, याबद्दल लेखिकेला संशय नाही.

आप्पांच्या पत्रलेखनाविषयीही लिहायला लेखिका विसरत नाही. आप्पांना पत्र लिहायला अतिशय आवडतं. (विकलांग झाल्यानंतर पराभूत मनोवृत्तीतून सावरायला पत्रलेखनच त्यांच्या उपयोगी पडलं, असंही वीणाताईंनी नमूद केलं आहे.) 'मात्र पत्रं मिताक्षरी. नेमका आशय सुचविणारी, भावसंपृक्त. पत्र वाचल्या वाचल्या उत्तर लिहिल्यामुळे त्या उत्तरात एक ताजेपणा असे, उत्स्फूर्तताही.' असं सांगून वीणाताईंचे पती पीएच. डी. झाल्यावर आप्पांनी टेलिफोनवरून त्यांचं अभिनंदन केलं. प्रत्यक्ष भेटूनही केलं आणि नंतर लिहिलेलं पत्र उदाहरणादाखल दिलं आहे. 'काही नाही. तुमच्या नावामागे डॉ. ही उपाधी लिहायला मिळावी म्हणून हे पत्र.'

वीणाताईंनी केवळ आप्पांचंच हे शब्दचित्र रेखाटलेलं नाही. त्यांच्या संदर्भात येणाऱ्या सर्वांचीच शब्दचित्रं त्या आपल्या चित्रदर्शी लेखनशैलीनं उभी करतात. आजीपेक्षा आईचं चित्र अधिक सुस्पष्ट आहे. नोकरी न करता लेखनावर जगायचं ठरवलेल्या माणसाशी लग्न करायला तयार झालेल्या स्त्रीचं मन आणि मतं तशीच खंबीर असणार. आर्थिकदृष्ट्या कठीण काळातही आप्पांनी व्यावसायिक तडजोडी कराव्यात, असं तिनं कधी सुचवलंही नाही. तसंच सुबत्तेत स्वतःसाठी काही मागितलंही नाही. मुलीला घरातली कामं यायला हवीत, पुढे जड जाईल अशा सवयी आणि लाड नकोत, मित्रमैत्रिणींवर म्हणजेच तिच्या संगतीवर बारीक लक्ष असणं आवश्यक, अशी मुलीला वळण लावण्याची पारंपरिक पद्धतच त्यांनी अनुसरली. आई-आप्पांचं एकमेकांत विरघळलेलं जीवन जसं लेखिकेनं चितारलं आहे तसंच दोघांत क्वचित उद्‌भवणाऱ्या ताणतणावांनाही तीच साक्षीदार आहे. आई सश्रद्ध आहे. नियमित आणि मनःपूर्वक देवाची उपासना करण्यात रमून जाणारी आहे. कहाणी 'आशक मस्त फकीरा'ची असली, तरी आईबद्दलही देवबाई भरभरून लिहितात. आई-वडील ही लेखिकेची दैवतं आहेत, पण त्यांना देव्हाऱ्यात बसवलेलं नाही. म्हणूनच नातेवाईक, स्नेह्यांचा गोतावळा, स्वतःचा आणि आप्पांचा मानसन्मान या सर्वांना दक्ष राहून सांभाळणाऱ्या ह्या स्त्रीला आप्पांच्या कादंबऱ्यांतील स्त्रियांच्या वाट्याला आलेली कोमलता पूर्णांशाने मिळाली नाही, याबद्दल लेखिका स्पष्टपणे खेद व्यक्त करते. एवढंच नाही, तर आप्पांनी आपल्या नादिष्टपणानं आईवर अन्याय केला, अशी जाणीवपूर्वक नोंद करते. निर्भीड सत्यकथन हे उत्कृष्ट चरित्रलेखनाचं गमक आहे, हे इथं आपोआपच सिद्ध होतं. 'अनकेदा घरगुती वादात ते तिच्या विरुद्ध बोलायचे, वागायचे,

संतापायचे. सुबत्ता आल्यावर आईला कष्ट कमी पडावेत म्हणून काही सोयी करून घेतल्या नाहीत' म्हणून कळवळते. 'तिचा विश्वास आणि तिचे कष्ट यांवर आज आमच्या आप्पांचं घर उभं आहे' असंही अभिमानानं नमूद करते. आप्पा आपल्या लेखनावर अभिप्राय मागतात, पण प्रतिकूल अभिप्राय त्यांना आवडत नाहीत. त्यांच्या आदर्शांना धक्का लावणारी मतं ते कला म्हणूनसुद्धा स्वीकारू शकत नाहीत. अशा प्रकारच्या आत्यंतिकतेविषयी लेखिका नाराजी व्यक्त करते.

'एरवी (बंदुकीच्या) गोळीसारखी दिसणारी भुरकी लेंडी हातात येऊन फजितवाडाच अधिक व्हायचा,' किंवा 'मला केरसुणी, लाटणं, पळी, पट्टी वगैरेंनी मार खाण्याची सवय होती आईच्या हातची. हा मर्दानी मार अंमळ जास्त झाला,' असा विनोद किंचित 'गोनीदां'च्या वळणाचा असला, तरी वीणाताईंची निवेदनशैली स्वतंत्र आहे. नेमकं चित्र उभं करणारी. साधी, सोपी. सरळ पण संस्कारित. भाराभर लिहून दिसणार नाही ते एखाद्या लहानशा वाक्यानं त्या सहज व्यक्त करून जातात. उदाहरणार्थ, 'आम्ही रेल्वेनं नर्मदेवरून चाललो होतो... आईनं बजावलं होतं, 'पहाटे नर्मदा येईल. जागी राहा.' मी राहणारच होते जागी. नर्मदेचा पूल आला. आप्पांनी फक्त मी उठलेय ना, तेवढं पाहिलं. तसंच 'मित्र म्हणून आप्पा अधिक खुले होते. आईमध्ये तो खुलेपणा यायला, नाही म्हटलं, तरी वेळ लागला. त्यासाठी माझं लग्न व्हावं लागलं. मला मूल व्हावं लागलं.'

'संसारात आप्पा रमले, हे खरं आहे. भ्रमण काळात एखाद्या साधूला शोभेलशी टोकाची विरक्ती आणि संसारात पडल्यावर तितकंच गुंतणं. एके काळी वैराग्यानं अंगाला राख फासणं आणि नंतर कानात अत्तराचा फाया ठेवणं, हे सगळं त्यांच्यात आहे. 'आशक मस्त फकीर हुवा' हे त्यांचं त्यांना स्वतःला आवडणारं रूप आहे.' हे प्रस्तुत पुस्तकाचं सार. गो. नी. दांडेकर या व्यक्तिमत्त्वाविषयी मराठी वाचक कधी काळी बुचकळ्यात पडला असेल, तर ते मळभ नष्ट होण्यास 'आशक मस्त फकीर' या पुस्तकातलं उपरोक्त अवतरण पुरेसं समर्थ असल्यानं त्यातूनच त्यांच्या साहित्याचं मूल्यमापन करण्यासाठी समीक्षकांना नवीन दिशा मिळू शकेल, असा विश्वास वाटतो.

(आशक मस्त फकीर : डॉ. वीणा देव, मॅजेस्टिक प्रकाशन, पृष्ठे १५५. मूल्य ६० रुपये)

('राऊळ' २०, हिंदुस्थान कॉलनी वर्धारोड, नागपूर ४४००१५)

---

**साभार स्वीकार**

२०. **डोनेशन**– प्रा. शंभूनाथ कहाळेकर, कविता प्रकाशन, पृष्ठे २२, मूल्य ५/- रु.

२१. **एक बंगला बने न्यारा**– कृ. ज. दिवेकर, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १५७, मूल्य ८०/-

२२. **दामोदर धर्मानंद कोसंबी**– चिंतामणी देशमुख, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १०८, मूल्य ४०/- रु.

भगवान ठाकूर

# बहिणाबाईंच्या कवितेची आस्वादक समीक्षा

एखाद्या कवीच्या कवितेपेक्षा त्यावरील काव्यसमीक्षा विपुल व्हावी, असे भाग्य मराठीत ज्या थोड्या कवी-कवयित्रींच्या वाट्याला आले, त्यांत 'खानदेशची मुक्ताई' असा सार्थ गौरव ज्यांचा केला जातो त्या बहिणाबाई चौधरींचा समावेश होतो.

भालचंद्र नेमाडे यांनी देशीसाहित्याची जी समृद्ध परंपरा मांडली त्यात खानदेशच्या मातीची महती गाणारे बालकवी, सानेगुरुजी यांच्याही आधी बहिणाबाईचं नाव घ्यावं लागतं. खरं तर बहिणाबाईची कविता कशी नाही हे सांगणे सोपे आहे आणि कशी आहे हे सांगणे अवघड आहे. बहिणाबाईची कविता दिखाऊ नाही, वरपांगी नाही, कृत्रिम नाही. त्यात गेयता, नाद, आंतरलय आहे, तरीही ती रचना किंवा रूढ अर्थाने गीत नाही. अस्सल कविता आहे. प्राचीन काव्य आणि अर्वाचीन काव्य यांचं एकरूपत्व त्यांच्या कवितेचे श्वास-निःश्वास आहेत.

बहिणाबाईंच्या कवितांवर त्यांचे सुपुत्र सुप्रसिद्ध कवी सोपानदेव चौधरींपासून तर आचार्य अत्रे, इंदिरा संतांपर्यंत अनेकांनी भरभरून लिहिलं. शालेय व महाविद्यालयीन स्तरांवर पाठ्यक्रमात 'बहिणाबाईची गाणी' असल्यामुळे या सर्व माहितीचं संकलन व संपादनाचा प्रयत्न डॉ. स. ग. यादव यांनी केला. तसाच पण अधिक विस्तृत संकलनाचा प्रयत्न आणि यथाशक्ती बहिणाबाईंच्या काव्याचं वर्गीकरण करून काही प्रातिनिधिक कवितांची आस्वादात्मक समीक्षा करण्याचा स्तुत्य प्रयत्न शांता वि. परांजपे यांनी 'काव्यचंद्रिका बहिणाबाई चौधरी' या ग्रंथात केला आहे.

डोंबिवलीच्या मोरया प्रकाशनाने प्रकाशित केलेलं हे पुस्तक विद्यार्थीवर्ग डोळ्यासमोर ठेवून जरी सुलभ सोप्या भाषेत बहिणाबाईच्या सर्व काव्यांगांचा स्थूल परिचय करून देणारं असलं, तरी एखाद्या कवीच्या काव्याचा किती सर्वांगांनी रसग्राही विचार करता येतो याचा वस्तुपाठ आहे. अवघ्या ८४ पृष्ठांचं १५ लहान लहान प्रकरणांत विभागलेलं छोटेखानी असं हे पुस्तक. शिरीष पै यांची समर्पक प्रस्तावना, परिशिष्टात बहिणाबाईंवर पूर्वप्रकाशित लेखांचे संदर्भ, आचार्य अत्रे, महादेवशास्त्री जोशी, पु. ल. देशपांडे आदींचे संक्षेपाने दिलेले अभिप्राय आणि शेवटी उपयुक्त संदर्भ साहित्य. या सर्वांमुळे फार सखोल जरी नाही, तरी बहिणाबाईंच्या काव्याचं अंतरंग पुरेसं ज्ञात होतं.

'शब्द बोलाचिच वाट पाहे' अशी बहिणाबाईंची कविता उत्स्फूर्त. कळीचं फूल व्हावं इतकी स्वाभाविक. एखाद्या रणरणत्या उन्हातून प्रवास करणाऱ्या वाटसरूला वाटेत अचानक



अनुक्रमणिका







आम्रवृक्षाची शीतलगर्द छाया लाभावी, असं समाधान देणारी ही कविता.

मराठी काव्यात 'देशीकार लेणे' शोभावे अशी ही मानवीजीवनाचे नवनीत रसिकाच्या करतळी अलगद ठेवणारी कविता. खरं तर मराठी काव्यात खऱ्या अर्थाने शुद्ध निसर्गकवितेची वाट प्रथम बहिणाबाईंनीच शोधली, असे म्हटले पाहिजे. केशवसुतांच्या निसर्गकविता ह्या निसर्गाचं बाह्यरूप सौंदर्य वर्णन करणाऱ्या आणि पाश्चात्त्य निसर्गकवींच्या काव्यानुकरणातून अवतरल्या आहेत; परंतु बहिणाबाईंची निसर्ग कविता देशी, आंतरबाह्य शुद्ध निसर्गाशी तन्मय झालेली कविता वाटते. खानदेशच्या मातीचा अस्सल गंध घेऊन येणारी ही कविता बालकवी आणि ना. धों. महानोरांच्या काव्यप्रेरणेची गंगोत्री वाटते.

शांता परांजपे यांनी या पुस्तकात बहिणाबाईंचा संक्षेपाने जो जीवनपट दिला आहे, त्यातूनही निसर्गाच्या-शेतमळ्याच्या मुक्त विद्यापीठात बहिणाबाईंच्या व्यक्तित्वाची मूस कशी घडत गेली ते स्पष्ट होते. शेतीची दैनंदिन कामं करता करता निसर्गाची बोली अवगत करणाऱ्या बहिणाबाईंना निसर्गाची जी गुपितं गवसली, लोकजीवनाचं जे आशयसूत्र सापडलं ते अद्वितीय आहे. लेखिका म्हणतात ते खरं आहे, 'बहिणाबाईंच्या काव्याचा केंद्रबिंदू 'करुण भाव' आहे. वात्सल्य, स्त्रीजीवनाबद्दल अपार ममत्व हा त्यांच्या व्यक्तित्वाचा स्थायीभाव आहे. खरं पाहिलं तर खानदेशच्या लोकगीतांत, स्त्रीगीतांत बहिणाबाईंच्या गाण्याची बीजं आढळतात. संतसाहित्याचे संस्कार पचवलेली इतकी आत्मनिष्ठ कविता तुकारामांनंतर आढळत नाही. १९५२ साली अचानक बहिणाबाईंच्या काव्यरूपी मोहरांचा हंडा आचार्य अत्र्यांच्या हाती लागला आणि निसर्गाची लिपी वाचणाऱ्या या प्रतिभासंपन्न कवयित्रीचा मराठी सारस्वतकारांना साक्षात्कार झाला.

*ऊन वाऱ्याशी खेयता*
*एका एका कोंबातून*
*पर्गटले दोन पानं*
*जसे हात जोडीसनं*
*टाया वाजवती पानं*
*दंग देवाच्या भजनी*
*जसे करती कारोन्या*
*होऊ दे रे आबादानी*

ही सृजनदेवतेबद्दलची कृतज्ञतेची जाणीव व्यक्त करणाऱ्या बहिणाबाईंचा पिंड विठोबा आणि रामाच्या मंदिरांत घडला होता. विशेष म्हणजे श्रद्धाशील व्यक्तित्वाच्या बहिणाबाईंचा जीवनविषयक दृष्टिकोन पारंपरिक– निव्वळ आध्यात्मिक नाही. 'अध्यात्म त्या बुद्धिवादावर घासून पुसून घेतात,' हे शिरीष पैंचे उद्‌गार खरेच आहेत.

लेखिकेने एखाद्या सुंदर महावस्त्राची घडी हळुवार उलगडावी तसे बहिणाबाईंच्या

काव्याचा एकेक पदर मोकळा करून त्यातील विचारसौंदर्यरूपी नक्षी रसिकतेने दाखवला आहे. अगदी त्यांनी प्रकरणांना दिलेली नावं जरी पाहिली तरी याची कल्पना येते. उदा. बहिणाबाई-शेतकरी स्त्रीच्या काव्यातील निसर्ग, बहिणाबाईंनी रेखलेलं स्त्रीजीवन, आत्मविषयक काव्य, अध्यात्म आणि कूटात्मक रचना, जीवनभाष्य, विनोदी रचना, सामाजिक व उपदेशात्मक काव्य, व्यक्तिचित्रं, प्रासंगिक काव्य, सुभाषितं व काव्यबद्ध म्हणी इ. प्रकरण १३ मध्ये 'कवी हा जन्मावा लागतो, तो घडविता येता नाही,' असा निष्कर्ष बहिणाबाईंच्या संदर्भात लेखिकेनं काढला आहे, तो उचितच आहे. ही प्रकरणे फार त्रोटक व संक्षिप्त आहेत. बहिणाबाईंच्या २-३ कवितांची नावं व एखाद्या कवितेतील अवतरण देऊन तेवढ्यावरून निष्कर्ष काढले आहेत. गाडीला १-२ तास वेळ आहे. तेवढ्या वेळात जहांगीर आर्ट गॅलरी पाहण्यासारखा हा प्रकार वाटतो.

बहिणाबाईंची कविता ही अहिराणी भाषेत, खानदेशी बोलीत आहे असं अनेकदा म्हटलं जातं पण ते तितकंसं खरं नाही. त्यांची कविता वऱ्हाडी बोली भाषेत आहे.

ही वऱ्हाडी बोली प्रमाण मराठीला जवळची आहे. तीत जळगाव जिल्ह्यात बोलल्या जाणाऱ्या खानदेशीतील काही शब्द आले आहेत, हे खरं, परंतु तरीही ती अहिराणी गीतं नाहीत. शुद्ध अहिराणीत लिहिणाऱ्या अलीकडील राजा महाजन, गणेश कुडे, सदाशिव माळी इ. अहिराणी कवींच्या रचना पाहिल्या तर याची खात्री पटते. शुद्ध अहिराणी काव्य पुण्या-मुंबईकडील काव्यरसिकांना फारसं कळू शकत नाही. पण बहिणाबाईंच्या काव्यातील थोडे शब्द सोडले, तर समग्र कविता सहज आकलन होते. तेव्हा बहिणाबाईंच्या इतर काव्य समीक्षकांप्रमाणे प्रस्तुत लेखिकेनंही भाषिक अंगानं केलेलं विवेचन (प्रकरण १४) पूर्णतः बरोबर नाही. अर्थात त्यामुळे बहिणाबाईंच्या काव्याची महत्ता कुठंही शबलित होत नाही.

या पुस्तकात गुणांची गोळाबेरीज अधिक आहे. मुख्य म्हणजे वर्ण्य विषयाबद्दलचा जिव्हाळा व प्रेम हे या पुस्तकाचं महत्त्वाचं वैशिष्ट्य आहे. क्वचित ठिकाणी मुद्रणदोष आहेत. त्यामुळे काही ठिकाणी बोलीभाषेचं स्वाभाविक रूप बदलून ते शब्द चक्क प्रमाण मराठीत लिहिले आहेत. उदा. इस्तवाऱ्या (इस्तवाच्या) धन्या, आता माझ्या माळे जीवन (जीव) देनं-घेणं (घेनं) नको करा (करू) धडपड इ. (पृ. ३४, ३५, ३६) तथापि बहिणाबाईंच्या काव्यातील नेमकं सौंदर्य, अभिव्यक्तीचं सौंदर्य आणि आशयाचंही लेखिकेनं उत्तम प्रकारे विशद केलं आहे. यमक-अनुप्रास-प्रतिमा यांतील सौंदर्यही उलगडून सांगितलं आहे. एकूण शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना एकत्र आणि चांगली माहिती मिळण्याच्या दृष्टीने हे पुस्तक नक्कीच उपयुक्त ठरणार आहे. लेखिकेचीही तेवढीच प्रामाणिक इच्छा आहे.

(काव्यचंद्रिका बहिणाबाई चौधरी (काव्यसमीक्षा)- शांता वि. परांजपे, मोरया प्रकाशन, डोंबिवली (प) पृष्ठ ८४, मूल्य ३० रुपये.)

(१५ ब, आविष्कार, विठ्ठलनगर, धुळे)



अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे
# कार्यवृत्त: १ एप्रिल ते ३० जून १९९३

**१ एप्रिल ९३ ते ३० जून ९३ या कालावधीत खालीलप्रमाणे कार्यक्रम आयोजित करण्यात आले :**

**(१) ज्ञानकोशकार केतकर स्मृतिदिन : १० एप्रिल** या दिवशी ज्ञानकोशकार डॉ. श्री.व्यं. केतकर यांच्या स्मृतिदिनी सकाळी ८ वाजता कमला नेहरू उद्यानातील डॉ. केतकरांच्या समाधिस्थानी श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. त्याच दिवशी सायंकाळी माधवराव पटवर्धन सभागृहात डॉ.प्र.ल. गावडे यांचे 'महाराष्ट्रीयांची काव्यसमीक्षा व डॉ.केतकर' या विषयावर व्याख्यान झाले.

**(२) प्रा. न.र. फाटक जन्मशताब्दी : १५ एप्रिल** श्रेष्ठ इतिहास संशोधक, समीक्षक, चरित्रकार, संत वाङ्मयाचे भाष्यकार व भूतपूर्व साहित्य संमेलनाध्यक्ष प्रा. न. र. फाटक यांच्या जन्मास १५-४-९३ रोजी १०० वर्षे पूर्ण झाली. या निमित्ताने प्रा. सौ. वैजयंती चिपळूणकर यांचे 'चरित्रकार न.र.फाटक' या विषयावर व्याख्यान झाले.

**(३) स.ह. मोडक स्मृतिपुरस्कार : १९ एप्रिल** स.ह. मोडक यांच्या स्मरणार्थ उत्कृष्ट अनुवादित ग्रंथास दिला जाणारा 'स.ह. मोडक ग्रंथपुरस्कार' श्री. शिरीष सहस्रबुद्धे यांना 'व्यक्ती संस्था प्रक्रिया' या ग्रंथाबद्दल ज्येष्ठ अनुवादक श्री.श्रीपाद जोशी यांच्या हस्ते देण्यात आला. या वेळी श्री. जोशी यांचे 'अनुवाद प्रक्रिया : काही अनुभव' या विषयावर व्याख्यान झाले.

**(४) ना. ग. गोरे : श्रद्धांजली सभा : १३ मे** श्रेष्ठ समाजवादी विचारवंत व लेखक आणि परिषदेचे भूतपूर्व अध्यक्ष ना. ग. तथा नानासाहेब गोरे यांना १३ मे रोजी श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. या वेळी डॉ. सरोजिनी बाबर, श्री. मोहन धारिया, श्री. यदुनाथ थत्ते व डॉ.गं.ना.जोगळेकर यांची भाषणे झाली.

**(५) म.सा. परिषद ८७ वा वर्धापन दिन : २७ मे** म.सा. परिषदेचा ८७ वा वर्धापन दिन समारंभ २७ मे रोजी म. फुले सभागृहात साजरा झाला. या वेळी डॉ. सरोजिनी बाबर यांच्या हस्ते ज्येष्ठ संशोधक समीक्षक म. वा. धोंड यांना म.सा. परिषद पारितोषिक देण्यात आले. श्री. शि. मो. घैसास (मुख्य कार्यवाह, मुंबई मराठी साहित्य संघ) यांना डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार देण्यात आला. या समारंभात परिषदेतर्फे देण्यात येणाऱ्या विविध ग्रंथ पारितोषिकांचे डॉ. बाबर यांच्या हस्ते वितरण करण्यात आले. २७ मे हा पं. जवाहरलाल नेहरू यांचा स्मृतिदिन असल्यामुळे या वेळी, ज्येष्ठ विचारवंत व 'महाराष्ट्र टाइम्स'चे संपादक श्री. गोविंद तळवलकर यांचे 'नेहरू : एक लेखक' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. न्या. रानडे यांच्या १५० व्या जयंतीवर्षाच्या निमित्ताने

घेण्यात आलेल्या निबंध स्पर्धेतील यशस्वी स्पर्धकांना श्री. तळवलकर यांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली. या वर्धापन समारंभास श्रोत्यांचा मोठा प्रतिसाद मिळाला.

**विशेष कार्यक्रम व उपक्रम**

आधुनिक महाराष्ट्राचे प्रबोधन करणारे थोर विचारवंत न्या. म. गो. रानडे यांच्या १५० व्या जयंती वर्षाच्या निमित्ताने खालील दोन कार्यक्रम आयोजिण्यात आले :

(१) **निबंध स्पर्धा** : न्यायमूर्ती रानडे यांच्या विविधांगी कार्याचे स्मरण व अध्ययन व्हावे यासाठी सर्वांसाठी निबंध स्पर्धा आयोजिण्यात आली होती. स्पर्धेसाठी खालील विषय निश्चित केले होते :

(अ) न्या. रानडे : एक द्रष्टा महापुरुष

(आ) न्या. रानडे यांचे राजकारण व समाजकारण

(इ) न्या. रानडे यांचे संस्थात्मक कार्य

या स्पर्धेस महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील स्पर्धकांकडून मोठा प्रतिसाद मिळाला. या स्पर्धेतील यशस्वी स्पर्धक पुढीलप्रमाणे :

(१) प्रथम पारितोषिक रु. ५००/- श्रीमती शकुंतला क्षीरसागर, पुणे.

(२) द्वितीय पारितोषिक रु. ३००/- प्रा. अजितानंद जाधव, सातारा.

(३) तृतीय पारितोषिक रु. २००/- प्रा. प्रकाश घाटे, दापोली.

याखेरीज खालील दोन स्पर्धकांना प्रत्येकी रु. १००/- ची उत्तेजनार्थ पारितोषिके देण्यात आली.

१) श्रीमती मेधा ओक, मुंबई

२) श्रीमती सुजाता शेणई, पुणे.

स्पर्धेचे परीक्षक म्हणून श्री. म. श्री. दीक्षित व डॉ. कल्याणी दिवेकर तर निमंत्रक म्हणून डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी काम केले.

२७ मे च्या म. सा. परिषदेच्या ८७ व्या वर्धापन दिन समारंभात यशस्वी स्पर्धकांना श्री. गोविंद तळवलकर यांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली.

(२) **'अनादि अव्यक्तु' : संगीत कार्यक्रम** : न्यायमूर्ती रानडे यांच्या धर्मविषयक विचारांना अनुसरून डॉ. दिलीप जोग, सौ. जोग व सहकारी यांनी २९ जून रोजी भक्तिसंगीताचा सुश्राव्य कार्यक्रम सादर केला. या कार्यक्रमास श्रोत्यांचा चांगला प्रतिसाद मिळाला.

अ. भा. मराठी साहित्य महामंडळाने दिलेल्या विशेष अर्थसाहाय्यातून वरील कार्यक्रम आयोजित करण्यात आले.

**गं. ना. जोगळेकर,** कार्यवाह

## ● श्रीरामपूर शाखा

**(१) नूतन पदाधिकारी व कार्यकारिणी सदस्य :** १९९२ ते १९९५ ह्या तीन वर्षांसाठी पुढीलप्रमाणे पदाधिकारी व कार्यकारिणी सदस्य एकमताने निवडण्यात आले : अध्यक्ष– ॲड. रावसाहेब शिंदे, उपाध्यक्ष– डॉ. शरदराव आगाशे, कार्याध्यक्ष– प्रा. डॉ. र. बा. मंचरकर, कोषाध्यक्ष– प्रा. सौ. मंजिरी सोमाणी, कार्यवाह– सौ. मीनाताई जगधने व प्रा. डॉ. अविनाश वि. कांबळे, कार्यकारिणी सदस्य– प्रकाश निकम पाटील, सौ. शशिकलाताई शिंदे, डी ज़ी. पोखरकर, दिनकर पोखरकर, प्रा. विश्वास काळे, सौ. सुमतीताई लांडे, सौ. मंगलताई काजळे, प्रा. प्रकाश देशमुख, श्री. मधुकर कारखानीस, प्राचार्य शिवाजीराव भोर (स्वीकृत सदस्य), प्रभाकर विसपुते (निमंत्रित सदस्य).

**(२) ११ जाने. ९३ 'कवितेच्या गावा जावे' (काव्यवाचन-काव्यगायनपर कार्यक्रम) :** ह्या कार्यक्रमात अरुण म्हात्रे, अशोक बागवे, अशोक नायगावकर, निरंजन उजगरे, सौमित्र व प्रकाश होळकर ह्या सहा कवींनी काव्यवाचन– काव्यगायन केले. सूत्रचालन सौ. सुमती लांडे ह्यांनी केले. प्रास्ताविक प्रा. डॉ. अविनाश वि. कांबळे ह्यांनी, तर आभारप्रदर्शन प्रा. सौ. मंजिरी सोमाणी ह्यांनी केले.

**(३) २६ फेब्रुवारी सौ. सुनीता देशपांडेलिखित 'आहे मनोहर तरी. . .' वर टिपणवाचन व चर्चा :** ह्या कार्यक्रमात प्रा. सौ. विद्या थिगळे, प्रा. सौ. मंजिरी सोमाणी व सौ. मीनाताई जगधने ह्यांनी आपापली टिपणे वाचली. त्यानंतर उपस्थितांनी त्यावर चर्चा केली. तीत ॲड. रावसाहेब शिंदे, प्राचार्य शिवाजीराव भोर, प्रा. डॉ. र. बा. मंचरकर आदी मान्यवरांनी भाग घेतला होता.

**(४) २९ मार्च ९३, 'साहित्यसंवाद' :** ह्या कार्यक्रमात श्री. मधुकर कारखानीस ह्यांनी 'छत्रपती लॉजमध्ये शिवाजी महाराज' ह्या आपल्या विनोदी कथेचे वाचन केले. डॉ. शरदराव आगाशे ह्यांनी वा. भ. बोरकरांची त्यांना आवडलेली 'तू गेल्यावर' ही कविता वाचून तिच्यावर स्वानुभवावर आधारित हृदयस्पर्शी व मार्मिक भाष्य केले. प्रा. डॉ. अविनाश वि. कांबळे ह्यांनी 'गझल' काव्यप्रकार व मराठीतील त्याची वाटचाल ह्या विषयावर उपस्थितांना माहिती देऊन स्वतःच्या चार गझलांचे वाचन केले. नंतर झालेल्या चर्चेत प्रा. डॉ. र. बा. मंचरकर, प्रा. ब. ह. विलायते, प्रा. डॉ. सदाशिव कदम, सौ. मेघा किराणे, सौ. श्यामला द्रविड इ. नी. भाग घेतला होता. प्रास्ताविक सौ. मीनाताई जगधने ह्यांनी, तर आभारप्रदर्शन प्रा. सौ. मंजिरी सोमाणी ह्यांनी केले.

**१५ एप्रिल :** कुसुमाग्रजांच्या 'विशाखा' ह्या काव्यसंग्रहाला १९९२ साली ५० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल सौ. श्यामला द्रविड ह्यांनी कुसुमाग्रजांच्या निवडक कवितांचे वाचन केले व त्यावरील आपले टिपण वाचून दाखविले. प्रा. विश्वास काळे ह्यांनी 'मशागत' हे आपले टिपण वाचून दाखवले. प्रा. हंबीरराव नाईक ह्यांनी आपल्या विनोदी कविता व वात्रटिका सादर केल्या.

कदम, प्रा. सुहास निर्मळे, सौ. मेघा किराणे, प्रभृतींनी चर्चेत भाग घेतला. सूत्रसंचालन सौ. मीनाताई जगधने ह्यांनी केले, आभारप्रदर्शन प्रा. मंजिरी सोमाणी ह्यांनी केले.

**५ मे :** थोर राजकारणी, समाजकारणी व साहित्यिक श्री. ना. ग. गोरे ह्यांच्या निधनानिमित्त शोकसभा घेण्यात आली. अध्यक्षस्थान रावसाहेब शिंदे ह्यांनी भूषविले होते. प्राचार्य शिवाजीराव भोर, प्राचार्य शंकरराव अनारसे, प्राचार्य नामदेवराव वामन, प्रा. डॉ. र. बा. मंचरकर प्रभृतींनी कै. गोरे ह्यांच्या कार्याचे महत्त्व स्पष्ट करून त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहिली.

**डॉ. अविनाश वि. कांबळे, सौ. मीनाताई जगधने**
कार्यवाह

## ● वाई शाखा

४ नोव्हेंबर १९९२ रोजी नव्या घटनेनुसार वार्षिक सर्वसाधारण सभेची बैठक होऊन त्यात १९९२-९३ ते १९९४-९५ या काळासाठी पुढील कार्यकारी मंडळ निवडण्यात आले

**अध्यक्ष–** डॉ. अ. वि. प्रभुणे
**उपाध्यक्ष–** प्रा. श्याम जोशी
श्री. अनिल जोशी
**कार्याध्यक्ष–** प्रा. श्रीपाद नानजकर
**कार्यवाह–** प्रा. विजयकुमार फरांदे
मधु नेने
**कोषाध्यक्ष–** श्री. माणिकचंद ओसवाल
**सदस्य–** डॉ. शरद अभ्यंकर, डॉ. शिवाजीराव चव्हाण, डॉ. व्यंकटेश कोटबागे, प्रा. सतीश सूर्यवंशी, सौ. पूर्वा प्रभुणे, ॲड. पां. बा. कोल्हापुरे.

**२० सप्टेंबर ९२ कविसंमेलन :**

बालकवी जन्मशताब्दीनिमित्त कविसंमेलन आयोजित करण्यात आले. अध्यक्षस्थानी रवींद्र भट होते. वाई परिसरातील २५ कवींनी आपल्या कविता सादर केल्या. प्रास्ताविक प्रा. विजयकुमार फरांदे यांनी केले. प्रा. श्रीपाद नानजकर यांनी कवी रवींद्र भट यांचा परिचय करून दिला. श्री. मधु नेने यांनी आभार मानले.

**४ नोव्हेंबर नाट्यवाचन**

वाई येथील सुप्रसिद्ध नाटककार प्रा. दिलीप जगताप यांनी स्वतः रूपांतरित केलेल्या 'बें बें करी बकरी' या नाटकाचे वाचन केले. डॉ. अ. वि. प्रभुणे अध्यक्षस्थानी होते. प्रा.

श्रीपाद नानजकर यांनी प्रास्ताविक भाषण व परिचय करून दिला. प्रा. विजयकुमार फरांदे यांनी आभार मानले.

**२९ नोव्हेंबर ९२ शाखा मेळावा :**

वाई शाखेच्या वतीने शाखा मेळावा दि. २९-११-९२ रोजी आयोजित करण्यात आला. या मेळाव्यासाठी सर्व शाखांचे मिळून पन्नासपेक्षा अधिक प्रतिनिधी उपस्थित होते. परिषदेचे उपक्रम व कार्यपद्धती व विविध समस्या यांवर सविस्तर चर्चा झाली. कार्याध्यक्ष डॉ. म. वि. गोखले, कार्यवाह रवींद्र भट, डॉ. कल्याणी दिवेकर, प्रा. भगवान ठाकूर, कोषाध्यक्ष ना.गो. जोशी व पत्रिकेचे संपादक वि. स. वाळिंबे यांनी मार्गदर्शन केले.

भोजनोत्तर विश्रांतीनंतर सायंकाळी ४-०० वाजता सुप्रसिद्ध कवयित्री डॉ. अरुणा ढेरे यांच्या अध्यक्षतेखाली कै. माधव ज्यूलियन यांच्या स्मृतिदिनानिमित्त कविसंमेलन आयोजित करण्यात आले. विविध शाखांतील वाई परिसरातील कवींनी त्यात सहभाग घेतला. प्रारंभी माधव ज्यूलियनांच्या काव्यावर श्री. रवींद्र भट व डॉ. अरुणा ढेरे यांची भाषणे झाली. या कविसंमेलनाचे सूत्रचालन प्रा. विजयकुमार फरांदे यांनी केले. सहभाग घेतलेले कवी पुढीलप्रमाणे :

रवींद्र भट, प्रा. पुरुषोत्तम पाटील, भालचंद्र रेडे, चंद्रकांत पालवे, प्रकाश होळकर, डी.बी. जगतपुरिया, भगवान ठाकूर, मधुकर कारखानीस, अवधूत कुलकर्णी, संदीप सुभेदार, प्रा. प्रदीप शिरसट पाटील, राजेंद्र हिरवे, चांगदेव काळे, सौ. शुभदा देशमुख, प्रा. श्याम जोशी, डॉ. व्यंकटेश कोटबागे, उमेश सणस, अनिल जोशी, द. वि. केसकर, प्रकाश पोरे, दीपाली सावंत, उज्ज्वला कदम, अनुपम बेहेरे, सौ. वैशाली नायकवडे, प्रकाश पुरी, सुनीलकुमार फरांदे, शशिकांत आडिवरेकर, दे. ल. शिंदे, संजय सकटे.

**८ फेब्रुवारी ९३ ग्रंथयात्रा व प्रदर्शन**

लो. टिळक ग्रंथालयात ग्रंथप्रदर्शन आयोजित केले होते. साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष श्री. रमेश मंत्री यांनी ही ग्रंथयात्रा आयोजित केली होती. प्रास्ताविक श्री. मधु नेने यांनी केले. स्वागत श्री. अशोक भट यांनी केले. प्रथम श्री. राजेंद्र मंत्री यांनी काव्यवाचन केले. त्यानंतर श्री. रमेश मंत्री यांनी विनोदी किस्से सांगितले. मराठी भाषेची वैशिष्ट्ये व शब्दांचे अनेक अर्थ यावरही ते बोलले. ग्रंथयात्रेचा हेतू व आलेल्या अनुभवांचे त्यांनी कथन केले. त्यानंतर श्री. पद्माकर गोवईकर यांनी आपल्या कविता सादर केल्या. डॉ. अ. वि. प्रभुणे यांच्या हस्ते पाहुण्यांचा सत्कार करण्यात आला. प्रा. श्रीपाद नानजकर यांनी आभार मानले. श्री. रवींद्र भट हेही या ग्रंथयात्रेत सहभागी झाले होते. त्यांनी आपल्या काही कविता व सातारा साहित्य संमेलनानिमित्त परिसरातील धार्मिक व सांस्कृतिक परिचय करून देणारा



अनुक्रमणिका






'गोंधळ' गाऊन सादर केला.

**कै. पिलाजीराव फडणीस स्मृतिदिनानिमित्त व्याख्याने दि. २ व ३ मार्च ९३**

परिषदेचे कार्यवाह श्री. रवींद्र भट यांची दि. २ व ३ मार्च रोजी अनुक्रमे 'विवेकानंद : व्यक्ती आणि विचार' व 'शिवसमर्थ कालखंड' या विषयांवर व्याख्याने गंगापुरी घाटावर आयोजित करण्यात आली.

**विजयकुमार फरांदे**
**मधु नेने**
कार्यवाह

## *हा वसाहतवादाचाच परिणाम*

स.न.वि.वि.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या जाने.-मार्च ९३ च्या अंकातील डॉ. आनंद पाटलांचा 'आद्य मराठी. . . उत्सव' हा लेख वाचला. आद्य मराठी स्त्री कादंबरीकार व पुरुषाच्या मुलाखतीमुळे आपले सांस्कृतिक व वाङ्मयीन केंद्र हरवून गेले आहे याबद्दलची अस्वस्थता डॉ. पाटील यांनी प्रकट केली हे बरे झाले. परंतु त्यांनी मराठीत समीक्षा व समीक्षक आहेत का, हा नेमाड्यांचा गंभीर प्रश्न मांडताना मराठी साहित्याच्या खुजेपणाची खरी खरूज दर्शविलेली आहे. त्यामुळे लेखक व समीक्षकांना आता खाजविण्याचे व खिजविण्याचे काम सतत करावे लागत आहे.

डॉ. आनंद पाटील यांनी पदोपदी इंग्रजी ग्रंथांचे आधार दिल्यामुळे वसाहतवादाचा परिणाम किती खोलवर झाला आहे हे समजून येते. डॉ. साहेबांनी इंग्रजी ग्रंथांइतकीच मराठी वाङ्मयेतिहास परंपरा वाचली असती, तर मराठी कादंबरीची स्थित्यंतरे त्यांना कळली असती. वसाहतवादाचा प्रश्न व त्याबाबत सखोल विचार केवळ नेमाडेच करू शकतात, समकालीनांना तो करणे कठीण आहे असे ते म्हणतात. संपूर्ण लेखात नेमाडे एके नेमाडेच आहेत. वन्समोअर मिळाला नसला तरी गायक नटाने एखादे पद पुन्हा म्हटले तर रसिकांची जी स्थिती होते, तशी वाचकांची होण्याची शक्यता आहे. निदान विद्यापीठातील प्राध्यापकाने उथळ व गांभीर्याचा अभाव असलेली टीका करू नये हा संकेत पाळावा.

स्त्रीसुलभ अशी शैली अस्तित्वात नव्हती, हे नेमाडे यांचे विधान पाटील बेधडकपणे वापरतात. डॉ. जोशी यांनी त्या तऱ्हेची उदाहरणे आपल्या लेखात स्वतंत्रपणे दिलेली आहेत. संशयकल्लोळ या देवलांच्या नाटकातील 'कृत्तिके'च्या मुखातील भाषा याच वळणाची आहे. भाषेचा हा बाज समजावून घ्यावयाचा, तर मराठी समाजाची सांस्कृतिक व भाषिक अंगे अवगत असावी लागतात.

**प्रा. विजयकुमार फरांदे**
शाकुंतल, प्राध्यापक कॉलनी, वाई ४१२८०३.



अनुक्रमणिका





# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

## अतिथी-निवाससंबंधी सुधारित नियम

म. सा. परिषदेच्या पुणे येथील अतिथी-निवासाच्या संदर्भात केलेले नियम म. सा. पत्रिका अंक क्र. २६२, जुलै-सप्टेंबर १९९२ मध्ये पृष्ठ क्र. ११०-१११ वर सभासदांच्या माहितीसाठी प्रसिद्ध करण्यात आले होते. अलीकडे म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाने त्यात काही बदल केले असून हे **सुधारित नियम** येथे प्रसिद्ध करण्यात येत आहेत. म. सा. पत्रिकेचा प्रस्तुत अंक (क्र. २६६ जुलै-सप्टेंबर १९९३) प्रकाशित होताच हे सुधारित नियम अमलात येत आहेत.

### सुधारित नियम

(१) म. सा. पत्रिका अंक क्र. २६२ पृ. ११०-१११ वर प्रसिद्ध केलेले अतिथी-निवाससंबंधीचे नियम परिषदेच्या कामासाठी आलेल्या, तसेच परिषदेने निमंत्रित केलेल्या व्यक्तींसाठी आहेत. ते यापुढेही चालू राहतील. या व्यक्तींना निवासासाठी देणगीशुल्क द्यावे लागणार नाही.

(२) म. सा. परिषदेच्या पुण्याबाहेरील **आजीव व साधाण सभासदांना** जागेच्या उपलब्धतेनुसार, परिषदेच्या कार्यालयास लेखी पूर्वसूचना दिल्यास व आगाऊ देणगीशुल्क भरल्यास अतिथी-निवासाची सुविधा प्राप्त होईल.

(३) अतिथी-निवासात राहू इच्छिणाऱ्या सभासदांनी कार्यालयास **किमान आठ दिवस आधी मिळेल,** अशी **लेखी सूचना** द्यावी. जागा उपलब्ध आहे किंवा नाही, याचे कार्यालयाकडून टपालाने त्वरित उत्तर पाठविले जाईल.

(४) लेखी पूर्वसूचना न देता ऐन वेळी आलेल्या सभासदास जागा उपलब्ध असल्यास नियमानुसार देणगीशुल्क देऊन राहता येईल.

(५) परिषदेच्या निवास-व्यवस्थेचा लाभ घेऊ इच्छिणाऱ्या सभासदांसाठी २४ तासांसाठी प्रति व्यक्तीस खालीलप्रमाणे देणगीशुल्क राहील. हे देणगीशुल्क कार्यालयात रोख रकमेने कार्यालयीन वेळात **(सकाळी ९-३० ते रात्री ८-००)** भरून पावती घ्यावी.

(अ) **आजीव** सभासद— प्रति दिवसास **रु. ३५/-**

(आ) **साधारण** सभासद— प्रति दिवसास **रु. ४०/-**

(६) परिषदेच्या कार्यालयीन वेळेनंतर **(रात्री ८-०० ते सकाळी ९-३०)** किंवा **रविवारी व सुट्टीच्या दिवशी** निवासासाठी येणाऱ्या सभासदांनी या वेळासाठी नियुक्त केलेल्या सेवककडे नियमानुसार देणगीशुल्क भरून त्याच्याकडून पावती घ्यावी.



अनुक्रमणिका






(७) कार्यालयीन वेळेनंतर तसेच रविवारी व सुट्टीच्या दिवसासाठी स्वतंत्र सेवकाची नियुक्ती करण्यात आली असून त्याच्याकडे देणगीशुल्काचे पावतीपुस्तक देण्यात आले आहे.

(८) निवासासाठी येणाऱ्या सभासदांनी अतिथीनिवासाच्या नोंदवहीत अपेक्षिलेल्या सर्व नोंदी करून स्वाक्षरी करावी.

(९) सभासदांना अतिथी-निवासात एका वेळी जास्तीत जास्त **तीन दिवस** राहता येईल.

(१०) अतिथी निवासात गादी, उशी, चादर, पिण्याचे पाणी इत्यादी आवश्यक वस्तू उपलब्ध होतील. अतिथीनिवासाच्या वापरासंबंधी आवश्यक त्या सूचना प्रत्येक खोलीत सभासदांच्या माहितीसाठी लावण्यात आल्या आहेत. सभासदांनी त्यांचे पालन करून परिषदेस सहकार्य करावे.

(११) स्त्री-सभासदाची व्यवस्था स्वतंत्र खोलीत करण्यात येईल.

(१२) सभासदांनी सूचना/तक्रारी नोंदविण्यासाठी अतिथीनिवासाच्या सेवकास नोंदवहीची मागणी केल्यास ती मिळू शकेल.

**डॉ. गं. ना. जोगळेकर**
**श्री. रवीन्द्र भट**
कार्यवाह

**डॉ. शंतनु चिंधडे**
**श्री. अरुण खोरे**
अधीक्षक

---

## साभार स्वीकार

२३. **वीसशे पन्नास–** नंदा खरे, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १४७, मूल्य ६०/- रु.
२४. **मनातल्या मनात–** साहेबराव ठाणगे, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ९५, मूल्य ४०/- रु.
२५. **रक्तपहाट–** लीला पटेल, ग्रंथाली प्रकाशन, पृष्ठे १४६, मूल्य ७०/- रु.
२६. **सरकारी खाक्या–** ना. रा. गुजर, ग्रंथघर प्रकाशन, पृष्ठे ८३, मूल्य २५/- रु.
२७. **प्रकाशपुत्र–** लक्ष्मण माने, ग्रंथाली प्रकाशन, पृष्ठे ६४, मूल्य २०/- रु.
२८. **भिवंडी दंगल १९८४–** सुरेश खोपडे, ग्रंथाली प्रकाशन, पृष्ठे ९२, मूल्य ३५/- रु.
२९. **किनवटचे दिवस–** डॉ. अरुण गद्रे, ग्रंथाली प्रकाशन, पृष्ठे ८१, मूल्य ३०/- रु.
३०. **शोधांच्या जन्मकथा भाग ३–** नंदिनी थत्ते, ग्रंथघर प्रकाशन, पृष्ठे ५६, मूल्य २०/- रु.
३१. **शोधांच्या जन्मकथा भाग ४–** नंदिनी थत्ते, ग्रंथघर प्रकाशन, पृष्ठे ६४, मूल्य २०/- रु.
३२. **वाटेवरच्या कविता–** अशोक नायगावकर, ग्रंथाली प्रकाशन, पृष्ठे ६६, मूल्य ३०/- रु.
३३. **एड्स–** डॉ. लीना देवधर, ग्रंथघर प्रकाशन, पृष्ठे ६८, मूल्य २०/- रु.
३४. **आदित्यमित्र–** प्रकाश यादवाडकर, ग्रंथघर प्रकाशन, पृष्ठे ७२, मूल्य २०/- रु.

३५. **नाथांची निवडक कविता**- प्रा. डॉ. अविनाश वि. कांबळे, श्री. गोपाळराव रा. चांडोले (सांगोले), पृष्ठे १०७, मूल्य २५/- रु.

३६. **यशोदीप**- बी. एम. लोणकर, सौ. विमलाबाई लोणकर, पृष्ठे ११०, मूल्य ५०/- रु.

३७. **चाणक्य विष्णुगुप्त**- गोविंद पुरुषोत्तम देशपांडे, पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठे ७७, मूल्य ५०/- रु.

३८. **माणूस माझी जात**- पद्मजा फाटक, पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठे १२४, मूल्य ६०/- रु.

३९. **फक्त एकच कारण**- वसंत कानेटकर, पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठे ११५, मूल्य ५०/- रु.

४०. **'जनता' पत्रातील लेख**- डॉ. बाबासाहेब आंबेडकर, संपादक अरुण कांबळे, पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठे ३०८, मूल्य १२५/- रु.

४१. **भ्रमर कळीतच रमला तर**- पं. राघवेंद्र पगडी, प्रपंच प्रकाशन, पृष्ठे १९५, मूल्य ६०/- रु.

४२. **मधाच्या घागरी**- फा. फ्रान्सिस कोरिया, सप्तर्षी प्रकाशन, पृष्ठे १७५, मूल्य ४०/- रु.

४३. **सामवेदी बोलीभाषा लोकसाहित्य**- रे. फा. फ्रान्सिस कोरिया, सप्तर्षि प्रकाशन, पृष्ठे २४६, मूल्य ७५/- रु.

४४. **ज्ञानदेव वाद आणि आकलन**- डॉ. गंगाधर मोरजे, मोरया प्रकाशन, पृष्ठे १०४, मूल्य ३५/- रु.

४५. **महान गाव**- रा. रं. बोराडे, मोरया प्रकाशन, पृष्ठे १२७, मूल्य ४०/- रु.

४६. **प्रकाशाची सावली**- स्मिता भागवत, मोरया प्रकाशन, पृष्ठे २६०, मूल्य १००/- रु.

४७. **परिवर्तनाचा प्रवर्तक बिल क्लिंटन**- रा. सो. सराफ, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९१, मूल्य १००/- रु.

४८. **कृतार्थ**- सौ. शालिनी गानू, पृष्ठे १९२.

४९. **मातीच्या चांदण्या**- शंकर विटणकर, मायबोली प्रकाशन, पृष्ठे ६४.

५०. **सावधान! बाबासाहेब तुमचा मर्डरऽऽऽ होत आहे!**- कांताराम सोनावणे, महाराष्ट्र चेतना साहित्य परिषद प्रकाशन, मूल्य १५/- रु.

५१. **समकालीन सामाजिक राजकीय वाद व प्रवोधन परंपरा**- प्रा. सुधीर वामनराव गव्हाणे, प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे १२०, मूल्य ७०/- रु.

५२. **कोकरउड्या**- प्रा. व. बा. बोधे, चंद्रकला प्रकाशन, पुणे, पृष्ठे २४८, मूल्य १२०/- रु.

५३. **धर्मयुद्ध**- सुमेध वडावाला (रिसबूड), रविराज प्रकाशन, पृष्ठे २१६, मूल्य ७०/- रु.

५४. **सत्यनारायण थापाडे पाटील**- डॉ. अनिल सहस्रबुद्धे, मोरया प्रकाशन, पृष्ठे १२२, मूल्य ४०/- रु.

५५. **खरे मास्तर**- विभावरी शिरूरकर, पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठे १३१, मूल्य ७०/- रु.

५६. **आभास आणि वास्तवता**- सौ. गार्गी सरदेसाई, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, पृष्ठे२६९, मूल्य ६५/- रु.

५७. **मादाम वोवारी**– जयंत घुपकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पृष्ठे ३५१, मूल्य ९०/- रु.

५८. **श्री ज्ञानेश्वर माऊली**– बाळासाहेब जांगळे, पंकज प्रकाशन, पृष्ठे ११२.

५९. **स्वातंत्र्यवीर सावरकर, चित्रपटकथा व संवाद**– विश्राम बेडेकर, पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठे ३३२, मूल्य १५०/- रु.

६०. **प्रीतीला पर्याय नाही**– विजया पुणेकर, बॉम्बे ट्रॅक्ट अ‍ॅण्ड बुक सोसायटी, मुंबई, पृष्ठे ४८, मूल्य १०/- रु.

६१. **वदनी कवळ घेता**– डॉ. प्रदीप रा. मालेगावकर, सौ. नीला मालेगावकर, पुणे, पृष्ठे ८४, मूल्य ४०/- रु.

६२. **या देशाला भवितव्य नाही ?**– गोविंद वाघमारे, साची प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ६४, मूल्य २५/- रु.

६३. **लोककला दशावतार**– अर्जुन जयराम परब, शलाका प्रकाशन, पृष्ठे ९९, मूल्य ५०/- रु.

६४. **यति यदुनाथ**– वा. रा. सोनार, चेतश्री प्रकाशन, पृष्ठे ३०३, मूल्य २००/- रु.

६५. **कुसुमाग्रज साहित्यसूची**– कु. सुभद्रा चौधरी, राही प्रकाशन, पृष्ठे ७१, मूल्य ३०/- रु.

६६. **मृगाजिन**– ब. ग. कुलकर्णी, चेतश्री प्रकाशन, पृष्ठे ९९, मूल्य ४०/- रु.

६७. **चैतन्याची पाने**– प्रा. डॉ. कृष्णा पोतदार, चेतश्री प्रकाशन, पृष्ठे ९२, मूल्य ५०/- रु.

६८. **यमक**– प्रल्हाद जाधव, चेतश्री प्रकाशन, पृष्ठे ६८, मूल्य ३०/- रु.

६९. **बाळाजी विश्वनाथ**– म. श्री. दीक्षित, श्री. देवदेवेश्वर संस्थान, पुणे, पृष्ठे ८०, मूल्य ४०/-

७०. **येईल तो दिन माझा**– यशवंत कानिटकर, ग्रंथाली प्रकाशन, पृष्ठे ९९, मूल्य ६०/- रु.

७१. **पानिपत १७६१**– त्र्यं. शं. शेजवलकर, राजहंस प्रकाशन, पृष्ठे २९०, मूल्य १००/- रु.

७२. **अनू, मनू, शिरू**– आसावरी काकडे, साकेत प्रकाशन, पृष्ठे १६, मूल्य ४/- रु.

७३. **टिक टॉक ट्रिंग**– आसावरी काकडे, अनुजा प्रकाशन, पृष्ठे १६, मूल्य ८/- रु.

७४. **जंगल जंगल जंगलात काय ?**– आसावरी काकडे, सेतू प्रकाशन, पृष्ठे १६, मूल्य १०/-

७५. **मर्युत्का**– अनुवाद सौ. सुहासिनी पाटील, धुळे, पृष्ठे १०३, मूल्य ४०/- रु.

७६. **श्री उत्तरेश्वर माहात्म्य**– भास्करबुवा साकतकर, विश्वस्त मंडळ, उत्तरेश्वर देवस्थान, मु. पो. केम, जि. सोलापूर, पृष्ठे १०४, मूल्य ३०/- रु.

७७. **भास्करविरचित श्री त्र्यंबकराज निवृत्ती विजय ग्रंथ**– भास्करबुवा साकतकर, सौ. सरस्वती गणेश कुलकर्णी, पृष्ठे ५०, मूल्य २/- रु.

७८. **श्री. संत ज्ञानेश्वर महाराज महिमा**– भास्करबुवा साकतकर, पृष्ठे १७६, मूल्य २५/- रु.

७९. **एकत्र गुंफून जीवित धागे**– सुधा जोशी, रा. भि. जोशी, अश्वमेध प्रकाशन, पृष्ठे ८०, मूल्य ४०/- रु.

८०. **संग्राममार्गी क्रांतिकारक नानासाहेब गोखले**– संकलक– शं. वि. जोशीराव, कै. नानासाहेब गोखले, स्मृतिग्रंथ समिती, पुणे, पृष्ठे १२२, मूल्य ३० /- रु. □










*अभ्यासकांच्या संग्रही हवेत असे*
*महत्त्वपूर्ण संदर्भग्रंथ*

■

मराठी वाङ्मयाचा इतिहास
(१३५० ते १६८०) खंड २ रा
संपादक– स. गं. मालशे
रु. ११०/-

■

मराठी वाङ्मयाचा इतिहास
(१९२० ते १९५०) खंड ६ भाग १
संपादक– गो. म. कुलकर्णी, डॉ. व. दि. कुलकर्णी
रु. १३५/-

■

मराठी वाङ्मयाचा इतिहास
(१९२० ते १९५०) खंड ६ भाग २
संपादक– गो. म. कुलकर्णी, डॉ. व. दि. कुलकर्णी
रु. १३५/-

■

भाषा व साहित्य : संशोधन
खंड ३
संपादक– डॉ. वसंत जोशी, प्रा. म. ना. अदवंत
रु. ८०/-

■

# महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रस्ता, पुणे ४११०३०

अनुक्रमणिका

Maharashta Sahitya Patrika Regd. No. 6398/57



**प्रा. न. र. फाटक**

जन्म : १५ एप्रिल १८९३ निधन : २१ डिसेंबर १९७९

१९४७ मध्ये हैदराबाद येथे भरलेल्या

एकतिसाव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

अनुक्रमणिका